# नवभारत

वर्ष ६ वें ] ऑगस्ट १९५३ [ अंक ११ वा



क वि ता, सा र सं क ल न इ त्या दि

किंमत १ रुपया







अनुक्रमणिका




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष सहावें | नवभारत | ऑगस्ट
अंक अकरावा | | १९५३

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर–आचार्य स. ज. भागवत – श्री. हरि कृष्ण मोहनी – प्रा. वि. म. बेडेकर
का. संपादक

---



---

वार्षिक रु. ९ | सहामाही रु. ५ | अंकास रु. १

मुद्रक व प्रकाशक र. ग. जोशी यांनीं सुलभ मुद्रणालय, २९१ शनिवार, पुणें २, येथें छापून सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.






# आगामी नाट्यमय विशेषांक

मागील अंकांत जाहीर केल्याप्रमाणें 'नवभारता'चा आगामी सेप्टेंबरचा — या सहाव्या वर्षाचा बारावा अंक — 'नाट्यमय विशेषांक' म्हणून द्यावयाचें योजिलें आहे. सुप्रसिद्ध थोर कन्नड साहित्यिक श्री. टी. पी. कैलासम् यांच्या मूळ इंग्रजी 'Purpose' या समग्र नाटकाचा श्री. के. नारायण काळे यांनीं केलेला अत्यंत सुंदर अनुवाद येत्या सेप्टेंबरच्या अंकांत प्रसिद्ध होईल.

श्री. त्यागराज परमशिव कैलासम् हे कन्नड साहित्यसृष्टींतील असामान्य प्रतिभेचे महान् नाटककार आणि कवि २९ नोव्हेंबर १९४६ सालीं निधन पावले. २९ जुलै हा त्यांचा जन्मदिन. त्यांच्या मृत्यूच्या आधीं नुकताच त्यांचा हीरकमहोत्सव साजरा झाला होता. १९४५ सालीं ते कन्नड-साहित्य-संमेलनाचे अध्यक्ष होते. — श्री. कैलासम् हे असामान्य बुद्धीचे व जातिवंत प्रतिभेचे साहित्यिक होते. घरची त्यांची गडगंज संपत्ति होती. त्यांनीं लंडन विद्यापीठाची भूगर्भशास्त्र या विषयांत उच्च पदवी संपादन केली होती. त्यांना उच्च सरकारी अधिकाराची जागाहि मिळाली होती. पण हा हुद्दा, मानमरातब, सुखी जीवन यांचा त्याग करून जन्मभर त्यांनीं संन्यस्त जीवन घालविलें. शेवटपर्यंत त्यांची प्रतिभेची आराधना चालू होती. त्यांची प्रतिभा अक्षरशः इतकी जिवंत होती कीं, बसल्या ठिकाणीं त्यांच्या प्रतिभामय चक्षूपुढें नाटकें स्फुरण पावत. नाटकांतील पात्रें त्यांच्या अंतश्चक्षूसमोर उभीं राहत आणि तीं पात्रें त्यांच्या मुखावाटें आपले विचार घडाघडा बोलायला लागत. ते लिहून काढायलाहि त्यांना सवड नसे. त्यांचीं कांहीं इंग्रजी नाटकें अशींच त्यांना स्फुरलेलीं असून, तीं त्यांच्या तोंडून बाहेर पडलेलीं, त्यांच्या शिष्यांनीं ऐकलीं व तीं पाठीमागून लिहून काढून प्रसिद्ध केलीं. श्री. कैलासम् यांचे एकनिष्ठ अंतेवासी बंगलोरचे श्री. बी. एस्. रामराव यांनीं श्री. कैलासम् यांचीं 'Purpose', 'Keechaka' हीं नाटकें अशींच आठवणीनें लिहून काढून प्रसिद्ध केलीं आहेत. — श्री. कैलासम् यांचें कन्नड व इंग्रजी या भाषांवर सारखेंच असामान्य प्रभुत्व होतें. कन्नड व इंग्रजी या दोन्हीहि भाषांतून त्यांनीं नाटकें, कविता लिहिल्या. त्यांचीं कन्नडमधील नाटकें सामाजिक विषयावर असून, त्यांनीं कन्नड नाट्यवाङ्मयांत विषय, कला व तंत्र यांच्या दृष्टीनें अक्षरशः क्रान्ति घडवून आणली. त्यांनीं इंग्रजीमधून लिहिलेलीं नाटकें मात्र रामायण-महाभारतांमधील कथांवर आधारलेलीं असून, भारत-रामायणांतील मूळ कथेच्या आशयांत, मूळ कथेंतील पात्रांच्या स्वभावपरिपोषांत त्यांनीं अगदीं नवीन, आधुनिक मनाला वेधून घेणारा असा, क्रांतिकारक अर्थ ओतला आहे. ज्या नाटकाचा मराठी अनुवाद 'नवभारतां'तून प्रसिद्ध होणार आहे, तें 'Purpose' हें नाटक मूळ महाभारतांतील एकलव्याच्या सुप्रसिद्ध कथेवर आधारलेलें आहे. महाभारतांतील मूळ एकलव्याची कथा मोठी विषादजनक असून, आधुनिक विचाराच्या सहृदय माणसाला त्या कथेंत एकलव्यावर झालेल्या दारुण अन्यायाबद्दल अत्यंत चुटपूट लागून राहते. पण श्री. कैलासम् यांनीं त्या कथेला व कथेंतील पात्रपरिपोषाला आपल्या प्रतिभेनें अशी कांहीं नवीन कलाटणी दिली आहे, त्या नाटकांत उदात्त व करुणरम्य वातावरण निर्माण करून एकलव्याचें भावसामर्थ्य असें कांहीं प्रकट करून दाखविलें आहे कीं, आधुनिक समतावादी विचाराच्या सहृदयालाहि मूळ महाभारतांतील एकलव्यावर झालेल्या अन्यायाचें अंशतः तरी परिमार्जन झाल्यासारखें वाटेल.

येत्या सेप्टेंबर-अंकांत समग्र नाटकाबरोबर श्री. कैलासम् यांच्यासंबंधीं प्रा. द. रा. बेन्द्रे, प्रा. वि. कृ. गोकाक, प्रा. रं. श्री. मुगळी इत्यादि तज्ज्ञांचे लेख येतील. त्यामुळें तो अंक एक प्रकारें 'कैलासम् विशेषांक'च होणार आहे. एका अत्यंत थोर आधुनिक भारतीय साहित्यिकाचा त्याच्या एका नाट्यकृतीसह सादर केलेला हा विशेषांकरूप परिचय वाचकांस स्वागतार्ह वाटेल असा विश्वास वाटतो.

[ २९-७-५३

— कार्यकारी संपादक ]






# म रा ठी–भा षे ति हा सा च्या वा टे व र

मराठी भाषेचा इतिहास लिहिण्याच्या कामास आतां लवकरच आरंभ व्हावयाचा आहे. पण भाषेतिहासाच्या कार्याला कालक्रमयुक्त शब्दकोशाची प्रथम जरूरी आहे. अशा कोशाच्या साहाय्या-शिवाय शब्दरूपांत कालक्रमानें कसकसा फरक होत गेला हें निश्चितपणें कळणें शक्य नाहीं. शब्दांतील अर्थाचा संकोच किंवा विकास कसा झाला हें जाणण्यासहि अशा प्रकारच्या कोशाची जरूरी आहे.

शिवाय आणखी एक मोठी उणीव भरून निघावयाची आहेच. मराठींतील संस्कृत व प्राकृत शब्दांचें निरुक्त किंवा व्युत्पत्ति जाणण्याचे प्रयत्न शास्त्रीय रीतीनें आजवर कांहींनीं केलेले आहेत; पण मराठींतील 'देशीकार लेण्याचें' वैभवहि कांहीं थोडें नाहीं. या देशीचें मूल्यमापन शास्त्रशुद्ध रीतीनें अजून व्हावयाचें आहे. या दिशेनें महाराष्ट्र-शब्दकोश व व्युत्पत्तिकोश यांतून कांहीं ढोबळ प्रयत्न झालेला आहे.

मराठींत अत्यंत मार्मिक व जिव्हाळ्याचे असे बरेच देशीय शब्द आहेत. त्यांचें औचित्य व स्वारस्य यांचा आनंद लुटावयास या देशीच्या मूलगामी अभ्यासाची जरूरी आहे. या दृष्टीनें पुढील स्वल्प तुलनात्मक अभ्यास विद्वानांपुढें मांडीत आहे. या प्रकारचा प्रयत्न चालू ठेवण्यास तज्ज्ञांच्या टीकेची व सूचनांची किती गरज आहे, हें निराळें सांगावयास नकोच.

### कडक, कडवा, कट्टर, करडा

कडक, कडवा, कट्टा, कट्टर हे शब्द देशीय आहेत, पत्तिजनांच्या (म्हणजे तथाकथित द्रविड) भाषावर्गातले आहेत. या शब्दांत रूपसाम्य तर आहेच; अर्थसाम्यहि पण आहे. तल्लख, जाज्वल्य, अतितीव्र अशा प्रकारचा यांत आत्यंतिकतेचा किंवा अतिशयितेचा सूचक हा समान ( common ) अर्थ असून थोडया फार फरकाच्या निराळ्या अर्थ-छटाहि प्रत्ययास येतात.

कन्दमिळ ( कानडी–तमिळ ) वर्गातील हे शब्द एकाच मुळापासून निष्पन्न झाले आहेत. कड्--कडु हे यांतील शब्दमूळ होय. किट्टेल्-कोशांत 'कडु' चे पुढील अर्थ आढळतील : firmness, strength, hardness, intensity, vehemence, impetuosity, swiftness, abundance, excess, greatness etc. तमिळ व मलेयाळं मध्यें 'कडु' धातूच आहे. त्याला अनेक अर्थ आहेत. त्यांतील to be full, to pervade हा अर्थ येथें लक्षांत घेतला पाहिजे.

'कडु' तील ड-काराचा र-कार होऊन बनलेले कांहीं शब्द आहेत. 'करडा अंमल', 'करडी नजर' वगैरेंतील करडेपणाचें रहस्य कळण्यास 'कडु' शब्दांतील मूलार्थ ध्यानांत घेणें जरूर आहे. कानडींत कर, करं, करु अशा तीन स्वरूपांत हा शब्द आढळतो. कर आणि करु या शब्दांना किट्टेल्नें पुढील अर्थ सांगितले आहेत : greatness, abundance, power. यांतील अतिशयितावाचक अर्थ लक्षांत घेण्याजोगा आहे. 'कर' अव्यय आहे, greatly, much असा तेथें अर्थ आहे. इडा = इरा = इळा प्रमाणें 'कडु' शब्दाचें 'कर' असें रूप होतें त्याचप्रमाणें कळ्, कळी या प्रकारचाहि बदल होतो. कानडी आणि








तामिळमध्यें ' कळि ' धातु असून त्याचा to be excessive, to be great in quantity or quality, to be abundant, copious, intensive असा अर्थ आहे. कळि विशेषणाला much, great, excessive, extreme असे अर्थ आहेत.

जुन्या कानडी आणि तमिळ भाषेंत दोन ळ-कार आहेत. यांतील दुसऱ्या ळ-काराला निराळें चिन्ह ( अक्षर ) हि आहे. या दोनहि ळ-कारांतील औचित्याचा पूर्ण सुगावा अजून लागला नाहीं, तरी दुसरा ळ-कार, डकाराचें आदेशाक्षर असतें असें शब्दमणिदर्पणकारानें ( १३ वें शतक ) सांगितलें आहे. त्याच्याच पुढें कांहीं ठिकाणीं ड-काराला साधा ळ-कारादेश होतो असेंहि एका सूत्रांत तो म्हणतो ( सूत्र १९ व २०; सन १८९९ प्रत ). काडु = काळ्; पण दाडिम = दाळिंब; झगडा = जगळ—हीं उदाहरणें दिलीं आहेत. तमिळ व कानडींत बहुवचन प्रत्ययाआधीं कळ् किंवा गळ् हें रूप शब्दापुढें येतें. कळ् > गळ् यांतील बहुलार्थ चिंत्य आहे. पण कळ् > गळ् मधील ळ-कार साधाच आहे. तरी पुढील विवरणांत कंदमिळ भाषेंत रूढ असलेल्या पद्धतीची कल्पना येण्याकरितां दुसरा विशेष ळ-कार जाड ठश्यांत दिला आहे.

कड्—कड्ड, कडक, कडवा, कट्टा, कट्टर, करडा; तसेंच कर—करु, करं आणि कळ, कळि या शब्दांतून विपुल, पुष्कळ, समूह, अशासारखा पूरेपूर अर्थ भरलेला आपण पाहिलें.

कड—कड्ड या शब्दमूलांतील या अर्थाच्या अनुरोधानें बनलेल्या या कुळींतील ( कड्—कड्ड गणांचा ) शब्दपसारा कसकसा होत गेला असावा याचा अभ्यास मोठा उद्बोधक व मनोरंजक ठरणार आहे यांत संशय नाहीं.

## कळप, कलाप, कोळपणें, कळक

मराठींत समूहार्थी कळप हा शब्द आहे. कळप < कलाप असें याचें निरुक्त मानलें जातें; आणि कलापचा संबंध संस्कृत भाषेंतील 'कला' या शब्दाशीं जोडला जातो. पण मोनियर विलियम्सला हा शब्द मुळांत संस्कृत असावा असें वाटत नाहीं. 'कला' या शब्दापुढें त्या कोशांत etymology doubtful असें नमूद केलेलें आढळेल. किट्टेल, काल्डवेल प्रभृतींना तो शब्द पश्चिजनांच्या भाषेंतून संस्कृतांत शिरला असावा असें वाटतें ( Kittel Dictionary, p. XXXIX ).

कल्, कले, कलसु-सारखे धातू कंदमिळ भाषावर्गांत आहेत. to mix, to unite, combine, blend असे त्या धातुला अर्थ आहेत. मराठींतील कालवणें, काला, यांसारखे शब्द या कुळींचेच होत. यामुळें ' कळप ' शब्दाचें मूळ ' कल 'पांतच असणें असंभाव्य नाहीं.

या ठिकाणीं संस्कृत ' कलाप ' शब्दाचेंहि सुंदर स्पष्टीकरण होत आहे. कलाप शब्दाला अनेक अर्थ आहेत. मोराचीं पिसें, केसांचा समूह, बाणांचा संग्रह म्हणजे भाता, हरळी ( गवत ) वगैरे अर्थ या एका शब्दांत सामावलेले आहेत. वरवर पाहतां या अर्थांचा एकमेकाशीं कांहीं संबंध दिसत नाहीं. पण थोडें निरीक्षण केलें असतां ' कलाप ' शब्दांत ' समूह ', ' विपुल ', ' फार ', असा मुख्यार्थ असलेला निदर्शनास येईल. कळप व कलापांतील समूहवाचक अर्थ स्पष्ट आहे. केस, पिसें, बाण, हरळी हे सर्व समूहार्थक एकवचनाचे शब्द आहेत.

कल्, कलि म्हणजे संग्रह करणें, मिळवणें. या अर्थामुळेंच विद्यासंपादन करणें, शिकणें असा अर्थहि कन्दमिळ भाषेंत आहे. विद्वान्, विद्यासंपादन केलेला अशा अर्थाचा ' कलिप ' शब्द या भाषेंत आहे. ' कलाप ' शब्दाला ' पंडित ' असा अर्थ असलेला संस्कृत कोशावरून कळतें. कलाप—कलापी म्हणजेच चतुर, एकांगी दृष्टीचा नव्हे असा, चतुरस्र, विविध दृष्टींनीं विचार करूं शकणारा, चौकसपणानें पुष्कळ ज्ञानसंग्रह केलेला—असा स्पष्ट भाव या शब्दांत सांठविलेला आहे. आणि हें अर्थौचित्य कळण्यास कल्, कलि हा मूळ शब्द हिशेबांत घेतला पाहिजे.

चक्रधराच्या 'लीलाचरित्रां'त 'कडप' शब्द दोनचार वेळां येतो. प्राकृतांत ' कडप्प ' असाच शब्द समूहार्थी आहे. पण तो शब्द प्राकृतांतून मराठींत आला असें मानण्यास एक अडचण आहे. पट्ट > पाट, मग्ग > माग, कप्पड > कापड या-

प्रमाणें प्राकृत 'कडप्प' मराठींत 'कडाप' व्हावयास हवा होता. यामुळें मूळ मराठी जनांकडूनच प्राकृतांत शिरतांना कडप > कडप्प झालें असें मानावें लागतें. पुढें या प्राकृतापासून संस्कृतांत कलाप < कडप्प झालें असें स्पष्ट होत आहे. शिवाय मराठींतील 'कळप'चें मूळ 'कडप' यांत आपणांस आढळतें. कळपच्या निरुक्ताकरितां प्राकृत 'कडप्प' किंवा संस्कृत 'कलाप'कडे धांव घेण्याची जरुरी राहत नाहीं. जर 'कळप' शब्द संस्कृत किंवा प्राकृतांतून आला असें गृहीत धरलें तर पुनः उच्चारशास्त्राची आडकाठी येते. कलापचें कळप कसें होईल? शिवाय कडपच्या जवळील मराठींतील कडबा, कडबा, करबाडे हे शब्दहि चिंत्य आहेत. कड, कडपच्या कुळीचे असे विपुल शब्द साधलेले ज्या भाषेंत आढळतात तिथेंच तो मूळ शब्द असावा असें मानणें सयुक्तिक होत नाहीं काय? यावरून प्राकृतांत व संस्कृतांत कसे शब्द शिरले असावेत याचाहि थोडा सुगावा लागत आहे.

कलाप शब्दांतील 'हरळी'–'गवत' या अर्थानुरोधानें विचार केला असतां बऱ्याच नव्या गोष्टी उजेडांत येणार आहेत. कळे, कळै हे शब्द (कानडी व तमिळ) नाम आणि धातु कन्दमिळ भाषेंत आहेत. पिकांतील हरळी, गवत काढण्याच्या क्रियेस मराठींत कोळपणें म्हणतात. कळे > कोळ(पणें) शक्य आहे. कळेचा मूळ शब्द कड् हाच आहे यांत मला तर शंका वाटत नाहीं. कन्दमिळ-वर्गीतील मूळ कड्–कट् शब्दाला जवळचा आणि कळेच्या आधींच्या स्वरूपांतील एक शब्द संस्कृतांत आढळतोः गवत या अर्थाचा 'कट' हा तो शब्द येथें चिंतनीय आहे. 'कट' वरूनच मराठींतील चट(ई) व कन्दमिळ भाषेंतील 'चापी' शब्द निष्पन्न झाले असावेत. कट शब्दाला संस्कृतांत गवत आणि चटई असे दोनहि अर्थ आहेत. चापे = चटई हिला जुन्या कानडी कोशांतून 'वंशासन' असा अर्थ सांगितला जातो. गवताप्रमाणें वेळूपासूनहि चटई करतात हें आजहि पाहावयास मिळतें. या चट(ई) > कट हिला वेळूंनीं केलेली वस्तु असा बाहेरून डकविलेला अर्थ नसून तो अर्थपूर्ण शब्द आहे. कलाप शब्दाला असलेल्या नानार्थांत 'वेळू, वेळूचें बीं' ('गीर्वाणलघुकोश' पाहा) असाहि अर्थ आढळतो. मराठींतील कळक आणि संस्कृत कलाप शब्द हे एकाच कुळीचे असल्याशिवाय हा अर्थ येथें संभवणेंच शक्य नाहीं.

कळकाला जवळचा 'कळग' शब्द कानडी कुणबाऊ भाषेंत आजहि रूढ आहे. छकड्याच्या बाजूच्या कठड्याला घातलेल्या बांबूला, वेळूला 'कळग' असें नांव आहे. शिवाय गळ (का.) म्हणजे वेळू. कळ (क) > गळ झालेलें आहे. मराठींतील कळ(क) शब्द कानडी 'गळ'चें पूर्वरूप आहे. तमिळमध्यें 'कळ' शब्द आहे. संस्कृत कलाप शब्दांत टिचून भरलेला समूहवाचक अर्थ व कळक, गळ यांतील औचित्य याचें स्वारस्य कळण्यास मूळ कड्–कड्ड यांतील 'अतिशय फार, विपुल' हा अर्थ लक्षांत घेणें जरूर आहे. मराठींतील 'कळ(क)' वरून पत्तिजनांमध्यें, कानडी, तमिळ, तेलगु अशा उपभाषा निर्माण होण्यापूर्वींच्या, शब्दरूपाची सूचना मिळत आहे.

'कणे', 'गणे' असें कन्दमिळ भाषेंत बाणाला नांव आहे. श्रीबसवेश्वरांच्या वचनांत 'बाण' या अर्थीं गळ आढळतो. वेळूपासून बाण करीत असत हें यावरून स्पष्ट होत आहे. बाण हा समूहार्थक एकवचनी शब्द होय. यावरून कलाप (बाण-समुदाय = भाता) या शब्दाची अर्थपूर्णता प्रतीत होत आहे.

**कलम, Cane**

सुश्रुतानें शाल्यादि जातींच्या भातांच्या यादींत 'कलम'चें नांव सांगितलें आहे. कानडींत कळमें किंवा कळवें–क्षुद्र प्रकारचें भात–आजहि उपलब्ध आहे. तमिळमध्यें कळमी नांवाचें भात आहे. कळमें किंवा कलम (संस्कृत) हें भाताचें नांव मराठींतच कसें आढळत नाहीं, याचें आश्चर्य वाटत होतें. पण कोळंब म्हणून कमी दर्जाची एक भाताची जात असलेली कळली.[1] कलमपेक्षां

१. श्री. धनंजयराव गाडगीळ यांनीं ही गोष्ट माझ्या नजरेस आणली.

साळी जास्त रुचकर व पुष्टिकारक असें सुश्रुत सांगतो. साळीविषयीं विद्वद्वर्य प्रा. गोडे यांचा संशोधनात्मक महत्त्वाचा लेख प्रसिद्ध झाला आहे.

कलम = कळमें = कोळंब असें म्हणण्यास प्रत्यवाय दिसत नाहीं. कळ पासून कोळ झाल्याचें, कळ काढणें म्हणजेच कोळपणें ( मराठींत ), हें यापूर्वीं दाखविलेंच आहे. गवताच्या एका रांगड्या जातीला करड म्हणतात. येथें कर < कड > कळ असल्याचें दिसून येत आहे.

कळ > गळ—गलगु. गलगु म्हणजे बोरू, लेखणी. वेळूसारख्या धाटाच्या कण्यापासून लेखणी करीत असतात. कलम असें लेखणीला संस्कृतांत नांव आहे. इंग्रजींतील cane हा शब्द ग्रीक भाषेंतील kanna पासून निष्पन्न झाला आहे. ग्रीकनें हा शब्द हिब्रूकडून घेतला असें समजलें जातें. पण वरील पूर्वपीठिका लक्षांत घेतली तर कलम पासूनच kanna पुढें आला असावा असें म्हणावेसें वाटतें. शिवाय कळकांच्या बेटांविषयीं हिंदुस्थानची ख्याति विशेष आहे. बायबलमध्यें इकडचे अनेक शब्द शिरलेले आहेत हें आतां सर्वमान्य झालें आहे. शिनू–शिनीवाली–Sinai चा पूजादि विधि हिंदुस्थानांतूनच मध्यपूर्वेकडे–ग्रीस वगैरे देशांकडे गेल्याचें प्रस्तुत लेखकाच्या ‘ मऱ्हाटी संस्कृति : कांहीं समस्या ’ (पा. १४७) या पुस्तकांत दाखविलें आहे. यामुळें कलम > Kanna > Cane होणें शक्य आहे.

या संदर्भांत ‘ कलम ’ मुळें आणखी एका गोष्टीवर थोडा नवा अंधुक प्रकाश पडत आहे. श्री. ल्यांग्डन् या प्रसिद्ध संशोधकाच्या मतें ब्राह्मी लिपीचें मूळ हरप्पा–मोहेंजोदारोच्या चित्रलिपींत आहे; आणि ती चित्रलिपि पत्तिजनांची ( तथाकथित द्रविडियन् ) असावी. श्री. ल्यांग्डन् यांच्या या विधानाला कलम शब्दाच्या वरील निरुक्तामुळें ( कड > कळ—कलम ) पुष्टि मिळत आहे. श्री. विठ्ठल रामजी शिंदे यांनीं मोडी लिपीविषयीं जें लिहिलें आहे त्यांतहि बराच तथ्यांश असलेला येथें निदर्शनास येत आहे. मराठींतील ‘ बोरू ’ हा शब्द कानडी ‘ बरे ’ धातूपासून बनलेला आहे. याला मराठी कोशकारांची संमति आहे. कोंकणी भाषेंत ‘लिहिणें’ या अर्थाचा ‘ बरे ’ धातु कोंकणींत आजहि जिवंत आहे.

मराठींतील ‘कडबा’ कानडींत ‘ कणके ’ नांवानें ओळखला जातो. कड < कळ > कण. कडबा कडबाडे—करबाडे या रूपांतहि आढळतो. जोंधळा, बाजरी वगैरेच्या धाटांच्या राशीला ‘कडवळे’ म्हणण्याचा प्रघात आहे. गंज, गंजी हा शब्दहि किती अर्थपूर्ण आहे याचें प्रत्यंतर येथें मिळणार आहे. कारण कण-गण हाच गंज शब्दांतील महत्त्वाचा शब्दभाग आहे. कड > कर यामुळें करबाडे व करड यांतील आंतरिक संबंध स्पष्ट होत आहे.

धाटांतील भागांना कानडींत कणके म्हणतात. मराठींत घणका, घणकोळ किंवा घणघोटा असें म्हणतात. यांतील ( मराठी ) घण < कण > ( कानडी ) कण ( के ) होय. मराठी घाणा शब्दाचा उलगडा येथें होत आहे: कणे, गणे शब्द ‘ कणा ’ या अर्थीं रूढ आहेत. मराठींत पाठीचा कणा वगैरे प्रयोग आजहि रूढ आहे. कण ( ा ) < कळ ( क ) हें निराळें सांगण्याची जरूरी दिसत नाहीं.

होडींतील डोलाच्या मागील काठीस ‘ कळंबी ’ ‘ कलमी ’, ‘ कलबी ’ म्हणतात. यांतील कळ = कल = गळ एकच होत. ह्या सर्व शब्दांवरून कळकाची आठवण होते.

कड > कळ या समूहार्थक मूळ शब्दापासून प्राण्यांचे समुदायवाचक शब्दहि बनलेले आहेत. जगण्याची प्रवृत्ति असलेले, सामूहिक जीवन जगण्याची प्रवृत्ति असलेले हरिण, गाई, मेंढ्या वगैरे प्राणी यांच्या थव्यांना ‘ कळप ’ असें नांव आहे. सांबर, हरिणजातीला कानडींत ‘ कडवे ’ नांव आहे. एका विशिष्ट धर्मपंथाच्या अनुयायांना ‘ कळप ’ शब्द वापरण्याचें प्रथम ज्याला सुचलें त्याची मार्मिक दृष्टि कौतुकास्पद आहे. ‘ गट ’ हाहि असाच एक अर्थपूर्ण शब्द आहे. गट < कट यांत राजकीय, सामाजिक संघटित पक्ष असा ध्वनि भरलेला आहे. समूह, संघ या सामान्यार्थांबरोबर वरील विशेषार्थांचा ध्वनीहि या शब्दांत प्रतीत होतो. व्यक्तिसमुदायवाचक ‘ गडी ’ शब्दांतहि असाच कांहीं अर्थ विशेष








दडलेला आहे. पण तो अजून पुरेसा रूढ झाला नाहीं. ‘गडण’ या कानडी शब्दांत समूह असा केवळ स्थूलार्थ आहे.

### संस्कृत ‘गण’ शब्दाचें कुळ

या ठिकाणीं संस्कृतांतील ‘गण’ शब्दाची आठवण झाल्याशिवाय राहत नाहीं. संस्कृतांतील १० व्या गणांतील ‘गण्’ धातूपासून हा शब्द साधण्याची प्रथा आहे. पण त्या धातूला समूहवाचक अर्थ हा मुख्य नाहीं. गण < कण < कळ < कड या वर्गातील ‘अति, फार, मोठ्या राशी, समूह’ या मूलार्थाच्या अनुरोधानें बनलेल्या विविध शब्दांचें निरीक्षण केलें असतां ‘गण’ शब्दाची मूळ कुळी कोणती असावी याबद्दल शंका राहत नाहीं. गणक, गणना, गणनीय, गणित, गण्य यांसारख्या शुद्ध गण् धातूपासून बनलेल्या शब्दांत सामावलेला अर्थ कोणीकडे आणि कड > गड > गळ > गण यांत ओथंबून वाहणारा समूह, राशि हा अर्थ कोणीकडे ? गण् म्हणजे गणणें, गणित करणें याचा फलितांश निश्चित आंकड्यांतच आला पाहिजे. राशि, समूह, असा स्थूल स्वरूपाचा अर्थ गण्पासून निघतो असें म्हणणें समंजस होणार नाहीं. केवळ उच्चारसादृश्यावरून या दोन भिन्न कुळींच्या शब्दांची गल्लत झालेली आहे.

जसा कळप, गट, कट या शब्दांतून विशिष्ट समुदाय असा अर्थ ध्वनित होत आहे, तसा ‘गण’ शब्दांतहि एक अर्थविशेष आहे. रुद्र-शिवाच्या अनुयायांना गण हें नांव आहे. कर्णाटांत वीरशैवांत हा शब्द आजहि रूढ आहे. गणाचारी आडनांवाचीं घराणीं त्यांच्यांत आहेत. गणाराधनाचे समारंभ बऱ्याच गांवांतून प्रतिवर्षी होत असतात. आर्येतर पत्तिजनांचें कुळदैवत रुद्र-शिव असून, आर्यांनीं त्यांच्याकडून हा देव स्वीकारला असें बऱ्याच विद्वानांचें मत आहे. या आर्येतर देवाबरोबर त्या दैवताच्या परिवारांचें विशिष्ट नांवहि स्वीकारलें गेलें असणें साहजिक आहे. रुद्र-शिवांतील ‘शिव’ शब्द आर्येतर पत्तिजनभाषेंतला आहे याचें विवरण ‘मऱ्हाटी संस्कृति : कांहीं समस्या’ या पुस्तकांत आलें आहेच (पा. १०१–१२४). शिव शब्द जर पत्तिजनभाषेंतला ठरेल तर ‘गण’-हि त्याच कुळीचा असावा असें निराळें सिद्ध करण्याची जरूरीच राहत नाहीं.

संस्कृतांतील ‘कटक’ शब्द मराठींतील ‘कळप’ या शब्दासारखा आहे. कळपपेक्षां कटक शब्द प्राचीन आहे ही गोष्ट त्या शब्दरूपावरूनच सिद्ध होत आहे. तमिळ भाषेंत कळगं म्हणजे संघ, सभा, समाज असा अर्थ आहे. पत्तिजनांच्या मूळ भाषेंत वर्गीय तृतीयाक्षराला स्वतंत्र स्थान नाहीं. जेव्हां शब्दामध्यें वर्गीय प्रथमाक्षरच येतें तेव्हां तें ग, ज, ड, द, ब सारखें तृतीयाक्षराप्रमाणें उच्चारलें जातें. तमिळ भाषेंत ही प्रथा आजहि राहिली आहे. यावरून कटक हा शब्द पत्तिजनांच्या भाषेंत लिहिलेला वाचला तर त्याचा उच्चार ‘कडग’ असा होतो आणि कडग (= कटक) ‘कळग’चें पूर्वरूप यांत बिलकुल शंका राहत नाहीं.

यावरून गण शब्दाची व्युत्पत्ति अशी असावी : कट (क) < कड (ग) > कळ (ग) > गळ > गण.

कळ (गळ) = गण या शब्दांत ‘समूह, राशि’ हा अर्थ गर्भित आहे. याचें प्रत्यंतर देणारे आणखी कांहीं शब्द तमिळ, कानडी व मराठी बोलींत या क्षणींहि आढळतात. पण त्यांचा आगा-पीछा लक्षांत न आल्यानें त्या शब्दांतून ध्वनित होणाऱ्या मूळ जिवंत अर्थध्वनीच्या आनंदास आपण पारखे झालों आहोंत. मग बाहेरून कांहीं अर्थ चिकटवीत असतों !

सुगींत धान्याची रास करण्याकरितां केलेल्या जागेस ‘खळं, खळें’ असें नांव आहे. कानडी व तमिळ भाषेंत ‘कळ’ शब्द आहे. कळ > खळ हें स्पष्ट आहे. कटक = कळग जनसमूहाची जागा, तर ‘कळ’, ‘खळ’ धान्यराशीची जागा. जुन्या कानडींतील कळ शब्द नव्या कानडींत ‘कण’ झालेला आहे.

यावरून ‘कण’ शब्दांत राशिसमूह हा अर्थ आहे हें उघड आहे. कण, कणिश, कणीस शब्दांतील समूहार्थ किती समर्पक आहे हें निराळें सांगावयास नको.

याच वर्गातील गड्डा, गड्डी हे शब्द व त्यांच्या जवळचे आणखी कांहीं थोडे यांचा किंचित्






विचार करून या कुळीच्या शब्दांचा स्थूल आढावा सध्यां संपविणार आहे.

'गड्डा', 'गड्डी' यांत असलेला समूह, राशि हा अर्थ उघडच आहे. आणि याचें शब्दमूळ गड् < कड् असल्याचेंहि निःसंशय आहे. मराठींतील गंठी, कानडींत गंट्टु–गदडी, दांठोडें याचेंच दुसरें रूप होय. मराठी 'कंठाळी', कानडी 'कंटले', तेलगु 'कंद्ल' तर तामिळ 'कंडाळ' हे अभिन्न असल्याचें वरवर पाहणारासहि दिसेल.

कळशी, घडा, घट

कळसा म्हणजे मडकीं वगैरे बनविण्याकरितां मळलेल्या मातीचा ढीग. माती, धान्य वगैरे चाळून गोळा करण्याच्या क्रियेस कळहाटणें असें म्हणतात. गळंग, गळहाटा हे शब्दहि येथें लक्षांत घेतल्यास यांतील अर्थाचें स्पष्टीकरण होणार आहे. संग्रह, ढीग, समूह, राशि हा अर्थ यांतून अनुस्यूत झालेला आढळेल. हे शब्द कळ् > गळ् या समूहाच्या शब्दमूलापासून बनलेले आहेत हें पाहिलें असतां त्यांतील अर्थाची सयुक्तिकताहि पटणार आहे.

मराठींतील कळी, कळशी, संस्कृत घट, मराठी घडा आणि गडू यांच्याबरोबर कानडी 'गडगें' याची तुलना करावी. कळी, कळशी < कड > गड (गे) > घडा, घट. तमिळ भाषेंत 'कळ' म्हणजे कळशी. तुळु भाषेंत याच अर्थी 'कर' शब्द आहे. तामिळ व कानडीमध्यें भांडें या अर्थी 'करग' शब्द आहे. तो संस्कृतांतून आला असावा अशी समजूत आहे. पण कल, कलश < कड > कर, करग (तमिळ, तुळु, कानडी, संस्कृत) हा संबंध स्पष्ट आहे. कड या मूळ शब्दाचा विस्तार ध्यानांत न आल्यानें घट शब्दाची व्युत्पत्ति घट् धातूपासून तर कलशची कल् धातूपासून सांगितली जाते. मोनिअर विलियम्ससारखे कांहीं याच्या व्युत्पत्तीविषयीं प्रश्नचिन्ह घालून शंका प्रदर्शित करतात. उलट करगचा संबंध कर म्हणजे हात त्याला नेऊन भिडवितांना कांहीं विद्वान् दिसतात !

संस्कृत भाषेंत प्रत्येक शब्द कोणत्या ना कोणत्या धातूशीं नेऊन भिडविण्याची पद्धति विशेष आहे. पण 'आख्यातजानि नामानि' हें मत मान्य नसलेला पक्षहि श्रीयास्काचार्यांच्याइतका तरी खास प्राचीन आहे. घण् घण्, या नादापासून घंटा शब्द रूढ झाला. ध्वन्यनुकृतीमुळें भाषेंत बरेच शब्द रूढ होतात ही गोष्ट खरी आहे. पण भाषेंतील शब्दांची छाननी करीत असतां त्यांतील कांहींच्या मुळाशीं धातु किंवा ध्वन्यनुकृति नसून, कांहीं निराळेंच विशिष्ट शब्दद्रव्य असलेलें प्रत्ययास येतें. पुढें त्या शब्दद्रव्यापासून धातु, नाम, विशेषणें, अव्यय इत्यादि व्यवहार्य रूपें बनलेलीं दिसतात आणि हीच लकब पत्तिजनांच्या भाषेचें वैशिष्ट्य आहे. कानडी शब्दसिद्धिक्रमाचें विवरण करीत असतां यांचें थोडें स्पष्टीकरण 'कन्नुडिय हुट्टु' (दुसरी आवृत्ति, प्रकरण ५ वें) या पुस्तकांत केलेलें आहे.

शिन्–केन्–चेन् या मूळ शब्दाचें स्वल्प विवरण 'मऱ्हाटी संस्कृतिः कांहीं समस्या' यांत आलें आहेच. कड्–कडु शब्द मुळाचा विस्तार कांहीं थोडा येथें दाखविला आहे. शब्दमूलांतील अक्षरें सामान्यतः दोनपेक्षां कधींच जास्त नसतात. त्या शब्दमूलाला कु, सु, पु, डु, ळु यांसारखे कांहीं प्रत्यय पुढें लागून नामधातुविशेषणादि शब्द-विस्तार होत असतो हें 'कन्नुडिय हुट्टु' या पुस्तकाच्या ५ व्या प्रकरणांत विशद केलें आहे. अशा प्रकारें नवे शब्द बनतेवेळीं शब्दमूलांतील अक्षरांत किंचित् फरकानें नवे नवे शब्द साधण्याची या भाषेंतली महत्त्वाची लकब आहे. कळक म्हणजे बांबू, वेळूंचा समूह, तर कलक (कानडी) = काला (मराठी), कडबा (कारवाडे) आणि करड (गुरांचा चारा) यांतील फरक पाहावा. अशा प्रकारचीं उदाहरणें कानडी भाषेंत तर विखुरलेलीं आहेत.

या वरील स्वल्प अभ्यासांत कांहीं तथ्यांश आहे असें ठरेल तर, यापूर्वी केलेल्या कांहीं तर्कांना बळकटी येणार आहे. चंद्र-मस् आणि तुर्-वश या शब्दांतील चन्द्र व तुर हे शब्द संस्कृत भाषेंतले आहेत असें 'मऱ्हाटी संस्कृति : कांहीं समस्या' या पुस्तकांत मांडलें आहे. चंद्र-मस् शब्द आर्य व पत्तिजन यांच्या ऐक्यास प्रारंभ झालेल्याची साक्ष देत आहे असेंहि तेथें सुचविलें आहे.



अनुक्रमणिका






## मराठी–भाषेतिहासाच्या वाटेवर

पूर्वी चन्द्र शब्दाचा उच्चार 'श्चंद्र' अशासारखा असावा असें श्री. राजवाडे यांनीं सप्रमाण सिद्ध केलें आहे. 'श्चन्द्र' शब्द पत्तिजनभाषेंतील शिन्-चिन् या शब्दमूळापासून बनलेला आहे असें निश्चित होईल, तर त्याच्या आजच्या चन्द्र या नव्या उच्चारास संस्कृत भाषेचा परिणामच कारण होय असें म्हणावें लागतें. संस्कृत भाषेच्या संपर्कामुळें पत्तिजनांच्या भाषेवर दूरगामी परिणाम होऊं लागले आणि त्यांत उपभाषा डोकावूं लागल्या. त्या उपभाषाच पुढें तमिळ, तेलगु, कानडी, मलेयाळं यांसारख्या स्वतंत्र भाषा झाल्या. अशा प्रकारें पुढील परिवर्तनास ऋग्वेदकाळींच प्रारंभ झाला हें श्चंद्र चंद्र शब्द सुचवितो.

' गण ' शब्द संस्कृतेतर भाषेंतला आहे हें मान्य होईल तर वरील तर्क अधिक सुप्रतिष्ठित होणार आहे. पत्तिजनांच्या भाषेंत शब्दांच्या आरंभीं वर्गीय प्रथमाक्षर असणेंच शक्य नाहीं, शब्दमध्यांत आलेलें वर्गीय प्रथमाक्षर मात्र तृतीयाक्षरासारखें उच्चारलें जातें. द्वितीयाक्षर ( महाप्राण ) तर नाहींच. गण शब्दांतील गकार हें वर्गीय तृतीयाक्षर आहे. त्यामुळें ऋग्वेदकाळींच पत्तिजनांच्या भाषेंत कानडीसारखी उच्चारपद्धति डोकावूं लागली असें म्हणावें लागतें.

कट, कटक, कलाप, कलश, गण सारखे शब्द वेदकालापासून संस्कृत भाषेच्या गाभ्यांत आढळतात. हे शब्द आर्य व पत्तिजनांचें ऐक्य किंवा सामरस्य वेदकाळींच किती दृढ झालें होतें याची साक्ष पटवीत आहेत. यावरून आर्य व पत्ति त्यांच्या संघर्षास व मिश्रणास ऋग्वेदपूर्वकाळापासूनच आरंभ झाल्याचें सिद्ध होत आहे. मोहेंजोदारो–हरप्पा-संस्कृतीच्या वेळीं आर्यांचा संपर्क घडला असावा या मताला यामुळें पुष्टि मिळत आहे.

कै. प्रा. एल्. व्ही. रामस्वामी यांनीं मोठ्या परिश्रमपूर्वक चिकित्सक पद्धतीनें अभ्यास करून पत्तिजनांच्या ( तथाकथित मूळ द्राविडीचें ) मूळभाषेचें आकलन करता यावें म्हणून बरेच लेख प्रसिद्ध केले आहेत. मिथिक सोसायटीज् जर्नल, इंडियन एंटिक्वेरी वगैरेंतून ते प्रसिद्ध झालेले आहेत. तमिळ, कानडी, तेलगु, तुळु इत्यादि भाषांसारखें मराठीकडूनहि तितकेंच महत्त्वाचें साहाय्य मिळेल अशी कोणासच कल्पना नव्हती. पत्तिजनांच्या भाषेचें प्राथमिक स्वरूप कळण्यास तमिळ भाषेचें फार मोठें साहाय्य लाभतें. कारण त्या भाषिकांनीं शक्य तों आपल्या भाषेंत फरक होऊं न देण्याचे प्रयत्न केले आहेत. जुन्या कानडींतहि कांहीं शब्द कांहीं वेळां तामिळपेक्षांहि तुलनेंत सरस ठरण्याजोगे आहेत असें प्रा. बी. एम्. श्रीकंठय्या यांनीं दाखविलें आहे. पण प्रस्तुत लेखांत दाखविल्याप्रमाणें मराठींतहि तशा प्रकारें बरेच शब्द तगून राहिलेले निदर्शनास येत आहेत. यामुळें पत्तिजनांच्या मूळ भाषेच्या स्वरूपाची कल्पना येण्यास तमिळ-कानडींच्या बरोबर मराठीचेंहि साहाय्य घेणें अनिवार्य ठरत आहे. मराठीनें अशा प्रकारें मोठ्या आपुलकीनें रक्षण करून ठेवलेली ही जी जिव्हाळ्याची शब्दसंपत्ति ती परभाषिकांची म्हणणें युक्त आणि न्याय्य होईल काय ?

### ' करवली '

मराठींतील ' देशीकार लेण्या 'चें सौंदर्य या तऱ्हेच्या तुलनात्मक अभ्यासानें खुलून दिसणार आहे. भाषेच्या पूर्वपरंपरा लुप्त होत गेल्यानें बोलींतील शब्दाच्या अर्थाचा जिवंतपणा संपुष्टांत येत चालला आहे. उदाहरणार्थ, मराठींतील 'करवली' शब्द घ्या. कानडींत वधूवरांच्या बहिणीस 'कळसगित्ति' म्हणतात. हातांत मंगल कलश, कळसा घेऊन विवाहसमयीं उभी ठाकणारी वधूवरांची भगिनी ती करवली. येथें कर, करा म्हणजे कळसा. तुळु भाषेंत कर शब्द आहेच. कानडींत ' करग ' रूप आहे. महानुभाव 'लीळाचरित्रां'त ( भाग ३ रा. पूर्वार्ध, खंड २ रा, पा. ५५ ) 'करा' शब्द त्या काळीं रूढ भाषेंतहि असल्याचा पुरावा मिळतो. करा शब्दाचें निरुक्त किंवा पूर्वपीठिका कळल्यानें त्यांतील अर्थसौष्ठवाचा होणारा आनंद कांहीं निराळाच आहे. अशा प्रकारच्यात अभिजात शब्दांची गोडी कळून तसे प्रयोग ' कवि, गमकी, वादी, वाग्मी ' यांच्याकडून, कथा-कादंबरीलेखकांकडून होऊं लागले तर श्रोते व वाचक यांचा रसिकपणा वाढेल व मराठी भाषेचें आंतरिक सौंदर्य निःसंशय वृद्धिंगत होईल.

प्रा. द. रा. बेन्द्रे

# 'अभिज्ञानशाकुन्तलां'तील वात्सल्याचें अधिष्ठान

" आपो हि ष्ठा मयोभुवस्ता न ऊर्जे दधातन । महेरणाय चक्षसे ॥ यो वः शिवतमो रसस्तस्य भाजयतेह नः । उशतीरिवमातरः ॥ तस्मा अरं गमाम वो यस्य क्षयाय जिन्वथ । आपो जनयथा च नः ॥ "–तैत्तरीयारण्यक

(" हे आपः, आपणच सुखसदन व्हा; आम्हांला ऊर्जस्वी, रसभोगयोग्य करा; आम्हांला परमरमणीय दर्शनयोग्यता द्या. कांठोकांठ कल्याणरसानें तुडुंब भरलेल्या आपल्या पात्राचे भागी आम्ही होऊं असें करा. माता आपल्या वात्सल्यामुळेंच वत्सांना स्तन्यपान करवितात ना ? हे आपः, ती जनक शक्ति आम्हांत निर्माण करा. ")–या मंत्रांत, अत्यंत प्राचीन अशा दैवी शुश्रूषेची प्रार्थना आहे. दैवी वात्सल्याचें अधिष्ठान येथें आहे. आमच्या ऋषींनीं, मुनींनीं आणि कवींनीं आपल्या श्रुतींतून, इतिहास महाकाव्यांतून, नाटकांतून या प्रार्थनेला पुनः पुनः रूप दिलें आहे. आदिकालिदासानें आपल्या तीन नाटकांतून ह्याच दर्शनाला नामरूप दिलें. त्यांतल्या त्यांत 'अभिज्ञानशाकुंतला'त त्या दर्शनानें सिद्धीचें टोंक गाठलें, 'शाकुन्तला'नें सार्वभौम कीर्ति मिळविली, हें त्याचा नाममात्र परिचय असलेल्यांनाहि माहीत आहे.

पुणें येथील १९५२ च्या वसंतव्याख्यानमालेंतील एका व्याख्यानप्रसंगीं मीं 'अभिज्ञानशाकुंतला'चें अधिष्ठानच काय, पण कार्य फल, निर्वहणहि वात्सल्यांत आहे असें सांगितलें व या दृष्टीचें दिग्दर्शन करण्याकरितां कांहीं गमकें दिलीं. त्यामुळें कांहीं रसिक मनें प्रक्षुब्ध झालीं. हा कांहीं समीक्षणविलासांतील केवळ 'स्टंट' नव्हे एवढें पटविण्याकरितां आणि विशेषतः त्या सहृदयांकरितां हा तौलनिक लेख मी लिहीत आहे. या लेखांत केवळ त्रोटक दिग्दर्शन केलें आहे. याच प्रश्नाची सविस्तर मांडणी शाकुंतल-समीक्षणात्मक सप्तांगसिद्ध प्रबंधाच्या द्वारें स्वतंत्रपणें मी पुढें करणार आहे.

## शृंगाराचें वात्सल्यांत साफल्य

वात्सल्यगर्भित शृंगार हा 'रतीकरितां रति' म्हणणाऱ्या कामुकतेहून व्यापक व चिरस्थायी आहे हें कामुकांनाहि मान्य होईल, असें मला वाटतें. आणि ज्या कामुकप्रमुखांना हें पटणार नाहीं ते मुळीं वात्सल्याच्या वाटांत न शिरतां आपल्या 'निष्काम' आणि 'निष्फल' क्रीडेंतच दंग राहतील ! त्यांचा संहार-उपसंहारहि तेथेंच आहे. शृंगार जेथें विराम पावतो तेथून वात्सल्याचा उगम होतो हें अनेकच कुटुंबवत्सलांना माहीत आहे. शृंगाराच्या अनुपरतीमुळेंच वात्सल्याला बाळसें येत नाहीं, आणि अनेक घरांतून कंकालशेष बालकांचें विदारक दृश्य आज थैमान करीत आहे, हें कोणीहि सभ्य गृहस्थ लपवूं शकत नाहीं. जणूं कांहीं याच कारणामुळें साहित्यशास्त्रांत शांतरसानें अविश्रान्त धडपड करून जेवढी जागा मिळविली तेवढी 'वात्सल्य'–चर्चेस मिळत नाहीं ! भक्तिमार्गीयांनीं मात्र वात्सल्याचें स्थान कबूल करून त्याचें स्वतंत्र दालन उघडलें आहे.

साधारण लोकांना 'वात्सल्य'रस अलौकिक वाटावा हें त्यांच्या प्रकृतीला धरून आहे. 'गृहिणी गृहमुच्यते' या सुभाषिताप्रमाणें 'गृहरत्नानि बालकाः' हेंहि त्यांना मान्य आहे; परंतु तो भाव स्त्री-










# ' अभिज्ञानशाकुन्तलां'तील वात्सल्याचें अधिष्ठान

प्रकृतींत जितका स्थिर झाला आहे, तितका पुरुष-प्रकृतींत अजून मूळ धरून राहत नसल्यामुळें त्या भावरसाची आर्द्रता अजून उत्कट झाली नाहीं. खरोखरीं मानवजातीला तें श्रेय गांठावयाचें आहे आणि देवांना आणि ऋषींना मानवांचें हें प्रेय साधावयाचें आहे. उत्तम साहित्यनिर्मितींत तें साधलें जातें. साहित्यांत श्रेय-प्रेयांचा प्रणयकलह प्रेमानें तोंडमिळवणी करतो आणि तो वात्सल्य-यज्ञानें सफल होतो, कृतकृत्य होतो.

वात्सल्यरसाचें दर्शन आदिकालिदासानें आपल्या नाटकांतून घडविलें. पण रसिकतेच्या विपर्यासानें आणि बुद्धीच्या प्राबल्यानें तें दिसेनासें झालें. महाकवि कालिदासानें 'रघु-कुमारां'तून वात्सल्याचा प्रपंच वाढविला; आणि वाच्यतेचा दोष पत्करूनहि भवभूतीनें 'उत्तररामचरितां'त त्याचा उठाव केला. परंतु अंगज रतीच्या रोगावर परम वैराग्याचाच मारा करावयाचें भारतीय बुद्धीनें पुढें जणूं ठरविलें. आणि अतिवैराग्याच्या आणि अतिरतीच्या त्या ग्रहणकालांतून सध्यां कोठें ही मानवता डोकें वर काढूं पाहात आहे. म्हणूनच ' अभिज्ञानशाकुंतला'वर आलेला शृंगारिक पडदा दूर सारून त्यांतील वात्सल्याचें दर्शन करविणें हें पुनः क्रमप्राप्त झालें आहे.

रंगभूमीवर स्त्री-पुरुषांची धांवपळ, लपंडाव, पाठलाग पाहिल्याक्षणीं शृंगाराचा खेळ आहे असें कल्पून आपल्याच मानसिक प्रपंचांत गुंगून जाणें हा आपल्या प्राणिमनाचा कोतेपणा आहे. आणि असल्या थिल्लरपणानें एखाद्या श्रेष्ठ नाट्य-कृतीचे कांहीं भाव ग्रहण करून त्याला रसग्रहण म्हणणें ही रसिकपणाची बतावणी असून, त्यांत सहृदयतेची हत्या होते. पण अशी गोष्ट आहे खरी. आंबटशोकी प्रेक्षक आणि केवळ शोकीन नट यांच्या जोडीला दिखाऊ समीक्षक सामील झाला म्हणजे जिवंत साहित्य समाधिस्थ होतें. आणि दिव्या-भोंवतीं घिरट्या घालणाऱ्या पतंगाप्रमाणें आपण अक्षरसाहित्याला प्रदक्षिणा घालूनच त्याचें व आपलें स्तोम माजवूं पाहतों. ' अभिज्ञानशाकुन्तल ' हें या आंधळ्या कोशिंबिरीच्या खेळांतून आपणांस बाहेर काढून, आपणांस कांहीं सन्मार्गदर्शन करूं शकतें काय, अशी शक्ति कालिदासाच्या प्रतिभेला आहे काय, हें पाहिलें पाहिजे.

## वात्सल्यानुकूल बहिःसृष्टि आणि अंतःसृष्टि

' शाकुन्तला'ची ' ' वस्तु ' च मुळीं ' भरत '-प्राप्तीनें पूर्णविराम पावते. भरतरहित शकुन्तलेचा स्वीकार होत नाहीं, धिक्कार होतो. शकुन्तला-जन्माच्या मुळाशीं एका अपत्यत्यागाची कथा सांगतात. पण तो एक लोकप्रवाद आहे. महाकथांची विटंबना अशीच होते. त्या कौशिकगोत्री राजर्षीचा उल्लेख अनसूया करते तो 'इंद्रांश' अवतार आहे.[१] त्याचा मेनकेशीं संबंध स्वभावप्राप्त आहे. यासंबंधीं देवाची, देवराज इन्द्राची व देवपितरांची सदिच्छा एकवटली आहे. शकुंतला वात्सल्यहीन पितरांची परित्यक्त कन्या नव्हे ! पुढील तपाला निघालेल्या शकुन्त-विश्वामित्रांची ती गायत्रीदर्शनपूर्व सृष्टि आहे. शकुन्तपक्ष्यांनीं शकुंतलेची काळजी घेणें हें कृतज्ञते-चें कृत्य आहे.-मारीचकश्यपाश्रमांत ' अंसव्यापि शकुंतनीडानिचितं बिभ्रज्जटामंडलं । ' ( शाकुन्तल, ७-११. ) या ओळींत उल्लेखिलेल्या तपोनिमग्न असलेल्या त्या मुनीजवळ मेनका आहे. मारीच-कश्यपांनीं कण्व व गौतमी यांची जणूं कांहीं शकुन्तले-च्या जोपासनेकरितां योजना केली आहे. (-या ध्वनितार्थाच्या बळावर श्री. मारुती वेंकटेश अय्यंगार यांनीं ' गौतमीनें सांगितलेली गोष्ट ' या नांवाची कथा कानडींत रचली असून ती आजच्या कानडी कथावाङ्मयांत उत्तम कथा म्हणून प्रख्यात आहे. त्या कथेचें भाषांतर 'नवभारता'च्या एप्रिल १९५३ च्या अंकांत आलें आहे.-) या सर्वांनीं दूरवर दृष्टि ठेवून वात्सल्याची तपस्या केली आहे. शकुन्त-विश्वामित्र-मेनका; कण्व-गौतमी; कश्यप-अदिति; इन्द्र-शची--या सर्वांची तपस्या दुष्यंत-शकुंतला-संयोग हा ' भरत '-जन्मांत सफल व्हावा आणि

---

१. पुराणांतरीं पुढील क्रमानें वंशवृक्ष सांपडतो :
प्रजापति > कुशिक > कुशनाभ > गाधिन् > विश्वामित्र > शकुन्त.








देव-मानवांच्या सख्याची पूर्वतयारी व्हावी याकरितां खर्ची पडली आहे.

शकुंतला तर मूर्तिमान् निसर्गमाता आहे. उलट पक्षीं, दुष्यन्ताच्याच अपत्यस्नेहवर्धनाला सात अंक लागतात. 'शाकुन्तलां'तील नाट्यवस्तूच्या गुंफणींतील पुष्कळ धागे वात्सल्यपोषक आहेत : अंगभूत कथा भरतप्राप्तीची, आंगिक कथा कण्व-शकुन्तलावात्सल्याची, कांठाकांठानें वाढणारी कथा दैविक व नैसर्गिक मातृवात्सल्याची. 'शाकुंतला'ची नांदीच ईश्वराच्या प्रत्यक्ष संरक्षक शक्तीबद्दल आहे. त्या शक्तीमुळेंच निसर्गक्षेत्रांत मातृशक्ति खेंचून भरली आहे. स्त्रींत ती स्थायी रूपानें असून पुरुषांत ती रसात्मकतेनें परिणत होण्याचा खटपटींत आहे. हेंच तर मौलिक कौटुंबिक नाटक. त्याचें सम्यक् दर्शन झालें पाहिजे. मग त्यांतून होणाऱ्या सम्यक् ज्ञानानें प्रेरित झालेल्या सम्यक् चारित्र्यानें अनंत सुखाचा मार्ग खुला होतो.

" जाया कोण ? पुत्र कोण ? रति–प्रीति–धर्म यांचें अधिष्ठान कोणतें ? मातृपदाची महती काय ? स्पर्शांत आत्यंतिक स्पर्श कोणता ? ' आत्मा वै पुत्रनामासि' या प्रचीतीची जात कोणती ? दुष्यन्ताच्या मोहात्मकतेचा दोष कोणता ? " या व इतर रहस्यमय गोष्टींचें बीज मूळ महाभारतांतील शकुंतलोपाख्यानांत शकुंतलेकडून व्यासांनीं वदविलें आहे. या गोष्टी मामुली साहित्यिक शृंगाराच्या चौकटीच्या बाहेरच्या आहेत. त्याच तर नाट्यरूपांतर पावून 'अभिज्ञानशाकुंतलां'त अवतरल्या आहेत. आईची भूमिका घेऊन घरची बेबी लुटुपुटीच्या संसारांत बाहुला-बाहुलीचें लग्न लावण्यांत दंग असते. तर शकुंतकन्या शकुन्तला झाडा-वेलींशीं सोदरस्नेहानें निगडित होऊन, मोठ्या बहिणीनें छोट्या बहिणीचें लग्न जुळविण्यांत रंगून जावें त्याप्रमाणें, वनज्योत्स्ना-सहकारांच्या गुणमेलन-कोष्टकांत गर्क होते. पण तीच शकुन्तला अचानक खऱ्याखुऱ्या लग्नाच्या तावडींत सांपडते. अपत्यरहित दुष्यन्त मृगयेंत दैवयोगानें आश्रम-हरिणाच्या पाठीस लागून, आश्रमभूमींत पाय ठेवतो व जणूं कांहीं आपल्या ' प्रतिसंहरण '-सामर्थ्यप्रदर्शनानें वैखानसाकडून ' पुत्रमेवंगुणोपेतं चक्रवर्तिनमाप्नुहि' हा आशीर्वादरूपी वर मिळवितो. ' चक्रवर्तिपुत्रप्राप्ति ' ही घडोघडी अथवा घरोघरीं घडणारी गोष्ट नव्हे. त्याबरोबरच आंतरिक जगांतून बाहुस्फुरणाच्या निमित्तानें ईप्सित स्त्रीप्राप्तीची सूचना येते. त्या सूचनेबरोबर मधुरालाप कानीं पडतात आणि शकुंतलेचें दर्शन होतांच राजा आपण आश्रमांत आहोंत हें विसरतो व एखाद्या गंधर्वनगरांत असल्याप्रमाणें वागतो. अनपत्य दुष्यन्त, चक्रवर्ती पुत्रासंबंधीं वर, निसर्गमाता शकुंतला, आणि बहिःसृष्टि व अंतःसृष्टि या दोन्हीहि ह्या दैवनियोजित कार्याला वडाडीनें अनुकूल—असा समवाय जमल्यावर काय विचारावें ? गार्हपत्य अग्नीप्रमाणें दुष्यन्ताचें प्रेम पेटतें, दक्षिणाग्नीप्रमाणें शकुन्तलेचा स्नेहभाव सात फेरा पसरतो, येऊं घातलेल्या चक्रवर्ती पुत्राच्या वात्सल्यज्वाला न कळत त्यांना आहवनीय अग्नीप्रमाणें आंतून कुरवाळीत असतात. या भूमिकेवरून कथेला सुरुवात होते. अर्थात् कुमारसंभवापूर्वींचें पति-पत्नी-सहवास-संयोगाचें नाटक पहिल्या तीन अंकांत रंगतें. परंतु अंकाअंकांतून मूळ प्रवाहाला मिळणारे वेगळे ओघळहि याच वात्सल्याच्या जातीचे आहेत हें लक्षांत आलें म्हणजे नाटकाच्या वात्सल्याभिमुख वृत्तीबद्दल संशय राहत नाहीं.

## गौतमीचें गूढ वात्सल्य

' शाकुन्तला 'च्या दुसऱ्या अंकांतील एक प्रमुख घटना म्हणजे ' पुत्रपिंडपालन ' नांवाच्या उपवासाच्या दिवशीं दुष्यंतानें नगराला परत यावें म्हणून राजमातेनें करभकाकडून पाठविलेला संदेश होय. जणूं कांहीं या संदेशामुळेंच दुष्यन्त आश्रमांत राहण्याचें ठरवितो ! ज्या मातृभाव-प्रेरणेमुळें राजमाता 'पुत्रपिंडपालन' उपवास करिते त्याच्या फलप्राप्तीचा दैवनियोजित मोका आश्रमांत असा जमून आला असतां, दुष्यन्तानें परत राजधानीस जाण्याचें ठरविलें असतें तरी तें कोणत्या ना कोणत्या कारणानें मोडलें असतें ! Plot is destiny ! दैवयोजना आणि नाट्यवस्तु या दोन नव्हेत ! तिसऱ्या अंकांत आपणांस गौतमीच्या मातृवात्सल्याचा अति गूढ प्रकार दिसून येतो. पहिल्या अंकांत तिच्या

नांवाचा उल्लेख येतो. तिसऱ्या अंकाच्या प्रारंभीं शकुंतला आतपलंघनानें अस्वस्थ झाली आहे हें वृत्त आश्रमवासीयांना कळतें. कण्व तर आश्रमांत नाहींत. शकुन्तला ('कण्वस्य कुलपतेः उच्छ्वसितम् इव') कण्वाची जीव कीं प्राण. तिच्या आरोग्याकरितां सारा आश्रम झटणार यांत संशय नाहीं. गौतमीकडून शान्त्युदक पाठविण्याची व्यवस्था केली जाईल हा निरोप देऊन यजमान-शिष्य जातो. या अंकाच्या शेवटीं गौतमी शान्त्युदक घेऊन येते. वावळट प्रेक्षकांना अथवा वाचकांना हा दुष्यन्त-शकुन्तलाव्यवहार सर्वथैव आश्रमाच्या डोळ्या-आड घडत आहे असें वाटल्यास हा नाट्यकलाजनित भ्रम सार्थकच झाला असें म्हणावें लागेल! वस्तुस्थिति मात्र बिलकुल तशी दिसत नाहीं. गर्भाधानाच्या मुहूर्तापूर्वीं मुलगी आजारी अथवा अशक्तशी वाटली तर सुजाण संसारी लोक त्याचा बिलकुल गवगवा न करतां, एका बाजूनें डॉक्टराचें औषध चालू ठेवूनहि इकडे पुरोहितांना मुहूर्त-निश्चयाचा लकडा लावतात आणि मुहूर्त साधतात. दुष्यन्त-शकुन्तला-विवाह-विधि हा गांधर्व-प्रकार होता. प्रियंवदा आणि अनसूया यांनाहि या घटनेंत सामील होतांना आपण कण्वांना अथवा आश्रमाला अमान्य होणाऱ्या प्रकारांत भाग घेत आहोंत असें वाटलें नाहीं. "चक्रवाकवधूः, आमंत्रयस्व सहचरम् उपस्थिता रजनी" हा नेपथ्यांतून येणारा इशारा गौतमीचा आहे. गौतमी जाणून आहे कीं, लताकुंजांत दुष्यन्त-शकुंतला आहेत. "दुष्यन्ताला लपविण्यापेक्षां, आपल्या समक्ष शकुन्तलेनें आपली प्रणयसिद्धि प्रकट करावी; नाहीं तर कठिण काळ येण्याचा संभव आहे", अशीच सूचना गौतमी 'उपस्थिता रजनी' म्हणून देते. 'प्रतिकूल दैव' तें हेंच! पण हा गौतमीचा सल्ला भाबड्या मुलींच्या लक्षांत येत नाहीं.

तिसऱ्या आणि चवथ्या अंकाच्या मध्यें घडून गेलेल्या एका घटनेचा—'दीर्घापांग' हरिणाच्या प्रसंगाचा—उल्लेख पांचव्या अंकांत दुष्यन्त-शकुन्तलामीलनाचा पुरावा म्हणून पुढें येतो. शकुन्तला सहजवात्सल्यानें भरलेली मंदाकिनी आहे आणि दुष्यन्त सावकाश पण निश्चितपणें आर्द्र होणारा पार्थिव प्राणी आहे. या पार्थिव बीजाला वात्सल्याचा मोड शकुन्तलाप्रेमाच्या संतत धारेनें येतो. पांचव्या अंकांत जी उघडझांप होते व कडक ऊन्ह पडतें तेंहि, सहाव्या अंकांतील विप्रलंभापेक्षां, सहाव्या अंकांतच नैमित्तिक रीतीनें आलेल्या धनमित्राच्या प्रसंगानें उफाळून बाहेर पडणाऱ्या वात्सल्याच्या अंकुरास जास्त पोषक आहे. तो अंकुर इतका प्रबळ आहे कीं, त्याचा सात्त्विक भाव मूर्च्छेंत परिणत होतो आणि योग असा कीं, इन्द्रलोकांतून मातलि दुष्यन्ताला बोलावण्याकरितां त्या क्षणींच येतो.

तिसऱ्या-चवथ्या अंकांमध्यें गर्भसंधीचा प्रारंभ आहे. शकुंतलेला गर्भाधानहि तेव्हांच झालें असलें पाहिजे. त्या दिवशीं अथवा नंतर एक-दोन दिवसांत 'दीर्घापांग'-प्रसंग घडला असला पाहिजे. दुर्वासाचा शाप आड आला नसता तर दीर्घापांग हरिण-शिशूच्या वात्सल्यपूर्ण कथानकानें, दुष्यन्त खास जागा झाला असता इतका तें हृदयभेदक आहे! पण प्रत्यक्ष शकुंतलेला पाहूनहि ज्याला तिचें प्रत्यभिज्ञान होत नाहीं, त्याला ही वात्सल्यकथा काय होय?

चवथा अंक तर कण्व-वात्सल्याचा कळस आहे. आश्रमाकरितां शकुंतलेनें काय काय केलें होतें, आश्रम शकुंतलेकरितां काय काय करूं शकतो यांतील प्रत्येक गोष्ट—परभृत काय, हरिण काय, वृक्ष काय, वेली काय, हीं सर्व निसर्गाच्या हृदयीं भरलेल्या वात्सल्याची साक्ष देतात : हरिणांनीं खाणें थांबविलें, मोर नाचेनात, लता पानें गाळूं लागल्या. शकुंतला वनज्योत्स्नेचा खास निरोप घेते. दीर्घापांग शकुंतलेचा पदर, बाळानें ओढावा त्याप्रमाणें, ओढतो. या एकेका प्रसंगानें रसोत्कर्ष होत जातो. आणि जेव्हां शकुंतला कण्वांना कुरवाळते व म्हणते, 'बाबा, आधींच तपानें जर्जर झालां आहांत. आतां माझ्या चिंतेनें वेगळें झिजूं नका!" तेव्हां वात्सल्याची परमावधि होते. आणि कण्वासारखा शमसिद्ध तपस्वी 'शममेष्यति मम शोकः कथं नु वत्से' असें म्हणत विरघळून जातो. शकुंतलेचें प्रतिकूल दैव काय आहे हें जाणूनहि तें प्रकट करतां








येत नाहीं ही व्यथा कण्वाच्या हृदयांत बोंचतेच आहे. तीहि एक त्याच्या विरघळून जाण्याच्या मुळाशीं आहे.

पांचव्या अंकांत शकुन्तलेच्या सत्त्वपरीक्षेची कमाल होते. शकुन्त-विश्वामित्रानें आणि मेनकेनें तिला पूर्वीं टाकलेली असो वा नसो, परंतु दुष्यन्त तिला टाकतो, आणि आश्रमाचे शार्ङ्गरवमिश्रहि, गौतमी 'माझ्या मुलीनें आतां काय करावें ?' असें म्हणत असतांहि, शकुन्तलेला तेथेंच टाकून जातात. तेव्हां शकुंतला म्हणते, 'दे माय धरणी ठाय'! इतक्यांत अप्सरस्तीर्थाजवळ आकाशांतून एक ज्योति येते आणि शकुंतलेला घेऊन जाते. तरीहि लोक म्हणतात कीं मेनका वात्सल्यहीन होती !

सहाव्या अंकांत अचानक धनमित्राचें प्रकरण पुढें येतें. आणि 'आपणाला संतति नाहीं, आपन्न-सत्त्व शकुंतलेला आपण होऊन आपण घालवून दिली, आपण आपल्या हातांनीं पौरववंश बुडाविला.' या विचारानें दुष्यंत ढवळून निघतो. आणि

'नूनं प्रसूतिविकलेन मया प्रसिक्तं
धौताश्रुशेषमुदकं पितरः पिबंति ।।'

असें म्हणून मूर्च्छित होतो. इकडे देव दुष्यन्त-शकुंतलेची भेट घडवून आणण्याच्या देवकारणांत गढलेच आहेत, हें सानुमतीकडून आपल्याला तेव्हांच कळतें. पितरांविषयीं दुष्यन्ताची वत्सलता आणि आपल्याला सन्तति नाहीं याविषयीं त्याची इळहळ या दोन्ही एकवटत असतांनाच देवदूत मातलीचा प्रवेश होतो आणि सातव्या अंकांत वात्सल्याचे सर्व प्रवाह एकमुखानें वाहूं लागतात.

सातव्या अंकांत तपस्वी शकुन्त-विश्वामित्र, दुहितृवत्सला मेनका, 'पुत्रप्रीतिपिशुन चक्षू'नें पाहणारे अदिति-मारीच, दुष्यन्त-शकुन्तला आणि भरत या सर्वांची भेट होते. या मंडळींना कण्वाची-हि आठवण होते. दुर्वासाच्या शापामुळें दारुण रूप धारण केलेला प्रसंग विधात्यांच्या प्रसादानें वात्सल्य-पर्यवसायी होतो. याकारितां दुष्यन्त-शकुंतला या दोघांनीं केलेली तपस्या थोडी-थोडकी नाहीं. दुष्यन्ताचें अंतःकरण शकुन्तलेच्या अखंड अनुसंधानांत स्थिर झालेलें आपण सहाव्या अंकांत पाहतों. 'अपि तपो वर्धते'–(काय तप वाढत आहे ना ?') असा पहिल्या भेटींत पहिला प्रश्न करणारा दुष्यन्त सातव्या अंकांत दीर्घ विरहव्रत आचरणाऱ्या श कु न्त ले ला पाहतो व क्षणभरच घोंटाळून आपणाला ओळखून 'ज य तु ज य तु' म्हणणाऱ्या श कु न्त ले च्या आपल्या मुलासमोर पायां पडतो ! म हा भा र तां त ( आदिपर्व ७४·४९. )–

'आत्माऽऽत्मनैव जनितः पुत्र इत्युच्यते बुधैः ।
तस्मात् भार्यां नरः पश्येत् मातृवत् पुत्रमातरम् ।।'

('आत्म्यांतून आत्म्याचा जन्म झाला म्हणजे ज्ञानी त्याला पुत्र म्हणतात. म्हणून पुत्रमाता होणाऱ्या भार्येकडे नरानें मातेप्रमाणें पाहावें') असें श्रीव्यास शकुन्तलेच्या तोंडून सांगवितात. त्या दृष्टीनें दुष्यन्ताचा हा शकुन्तलेला प्रणाम प्रिया-प्रणयाराधनाचा प्रकार नसून वात्सल्याची साधना आहे.

'भार्यां पतिः संप्रविश्य स यस्माज्जायते पुनः
जायायास्तद्धि जायात्वं पौराणाः कवयो विदुः'
—म. भा. ७४·३७.

'पति हा भार्येच्या पोटीं शिरून पुनः नवीन देहधारणा करून जन्माला येतो. म्हणून तर तिला पुराणकवी जाया म्हणतात.' 'पुनः पुनर्जायमाना पुराणी' उषेप्रमाणें ही जाया आत्म-रवीला सदा उदय देण्यास सज्ज असते. प्रत्येक भार्या जाया नसते. दुष्यन्ताच्या एका भार्येचें विदूषक 'अंतःपुरकालकूट' म्हणून वर्णन करतो. दुसरी हंसपदिका थोडी रसिक वाटते; पण दुष्यन्ताला स्थैर्य देण्याचें सत्त्व तिच्यांत नव्हतें, हें स्पष्ट आहे. बऱ्याच संततिहीन घराण्यांचें स्वामित्व दुष्यन्ता-कडे आलेलें आणि तोहि स्वतः अपत्यहीन. परन्तु ऋषींनीं भाकीत केलें होतें कीं, याच्या पोटीं चक्रवर्ती राजा येणार. हीच काय ती समाधानाची गोष्ट आणि फलप्राप्ति दूरावत चालल्यामुळें यांतच असमाधानहि होतें. वात्सल्य अंकाअंकांतून पायरीपायरीनें वाढत वाढत सातव्या अंकांत परिपाक पावतें. म्हणून ७ व्या अंकांत भरताच्या प्रथमदर्शनीं दुष्यन्त उद्गार काढतो : "किंनु खलु बालेऽस्मिन् औरस इव पुत्रे स्निह्यति मे मनः । नूनम् अनपत्यता मां वत्सलयति"–('या बालकाविषयीं माझ्या मनांत औरस पुत्राप्रमाणें कां बरें स्नेह

# 'अभिज्ञानशाकुन्तलां'तील वात्सल्याचें अधिष्ठान

वाटतो? माझी अनपत्यता मला वत्सल बनविते खास!'). याच सातव्या अंकांत [illegible]अभिज्ञा, विरहोत्तर समागम व वात्सल्याची परिपूर्णता होते. पहिल्या अंकांतील पसायदान सातव्यांत व्याजासकट दुष्यन्ताच्या हातीं लागतें. शकुन्तला तर मातृत्वाच्या नैसर्गिक वात्सल्यानें पृथ्वीवर अवतरलेली देवमाया आहे. म्हणून तर महाभारतांत श्रीव्यास शकुन्तलेच्या मुखानें 'गार्हस्थ्योपनिषदा'-चीं पुढील महावाक्यें वदवितात : "तूं एकटाच औरस असें समजतोस कीं काय? हृदयस्थ पुरुषाला, त्या पुराण मुनीला, तूं ओळखीत नाहींस." ('एकोऽहमस्मीति न मन्यसे त्वं न हृच्छयं वेत्सि मुनिं पुराणम्'।) "कर्मसाक्षी क्षेत्रज्ञ हा ज्याच्या त्याच्या हृदयांत आहे. जो अशा आत्म्याचा अवमान करतो त्याचें श्रेय देव करीत नाहीं. स्त्रियांची पदवी तूं काय समजतोस?"—

'रतिं प्रीतिं च धर्मं च तास्वायत्तमवेक्ष्य हि ।
आत्मनो जन्मनः क्षेत्रं पुण्यं रामाः सनातनाः ।
ऋषीणामपि का शक्तिः स्रष्टुं रामामृते प्रजाम् ।।'

"रति, प्रीति आणि धर्म हे उत्तम स्त्रियांत स्वायत्त असतात. उत्तम स्त्रिया हें आत्म्याच्या जन्माचें पुण्यक्षेत्र आहे. प्रजासृष्टीकरितां उत्तम स्त्रियांच्या सहकार्यांशिवाय ऋषीसुद्धां समर्थ नाहींत." श्री. शंकराचार्यांनींहि म्हटलें आहे :

'शिवः शक्त्या युक्तो यदि भवति शक्तः प्रभवितुम्
न चेदेवं देवो न खलु कुशलः स्पंदितुमपि'

"शक्तीनें युक्त झाला म्हणजेच शिवाला सृष्टिसामर्थ्य येतें. तसें जर नसेल तर त्या देवाला स्पंदन करणेंहि शक्य नाहीं." श्रीज्ञानेश्वरांनीं 'अनुभवामृता'च्या प्रारंभीं वंदिलेली देवोदेवी ही जगाची जननी व जनक यांचें स्वरूप—अन्य भूमिकेवरील रहस्य—या दर्शनांत आहे. अशा दर्शनाच्या पोटीं ज्ञानदेवाचा साक्षात्कार होतो. भरतखंडाला आपल्या नांवानें पुनः शिक्कामोर्तब करणारा हा दुसरा भरत चक्रवर्ती (—पहिला नाभिपुत्र ऋषभदेवाच्या पोटीं येतो ती कथा भागवतांत आहे.—) शकुंतलेच्या पुण्यक्षेत्रांत जन्म घेतो. शकुंतला हें सामान्य क्षेत्र नव्हे. मेनकेचें देवदास्य, सृष्टीचें दैवी वात्सल्य, इंद्राची दिव्य मैत्री, अदिति-कश्यपांचें परम माधुर्य, कण्वाचें सात्त्विक कारुण्य, शकुंत-विश्वामित्राचें महातप, हीं सर्व शकुंतलेंत सफल झालीं होतीं. सोम-बुध-पुरूरवा-आयु-नहुष-ययाति-पुरु-आदींच्या वंशांत, तारा, इळा, उर्वशी, देवयानी, शर्मिष्ठा आदि मातृक्षेत्रांतून आलेला दुष्यन्तहि अलौकिक पुरुषच होता. म्हणून 'शाकुंतला'चें कथाबीज रतिगर्भित आहे कीं वात्सल्यगर्भित आहे हें कोणींहि ठरवावें. रंगाची पारख डोळ्याला होत नाहीं म्हणून निळ्याला काळा म्हणावें त्याप्रमाणें वात्सल्याला कांहीं भोंगळ जीव रतींत, भोगेच्छेंतच घुसडून देतात. कळसाची उंची लक्षांत घेऊन देवळाचा पाया भरावा लागतो. सातव्या अंकांतील वात्सल्य ओळखून तरी पहिल्या अंकाचा पाया कशावर उभा आहे याचा विचार रसिकांनीं करावा. स्त्रीहृदयांतील सहज-वात्सल्य पुरुषहृदयांत उतरण्यास सात अंकच काय, सात जन्म, सात युगें लागतात! कधीं कधीं कवींच्या कृपेनें सात सर्गांत, सात अंकांत वात्सल्य-रस मूर्त होतो खरा. पण त्याचें दर्शन सामान्य रतीचे सात पापुद्रे सोलून निघाल्याशिवाय सहजासहजीं होणार नाहीं. शकुंतला-दुष्यंतांचें श्रेय आणि अदिति-कश्यपांचें प्रेय हीं भरतांत साफल्य पावतात. हीं दोन टोकें लक्षांत ठेवून 'अभिज्ञानशाकुंतला'-च्या वाढीकडे पाहावें. मूळ बीजमंत्र (शकुंतलेचें) ध्यान, (परस्पराकर्षण वाढून तें जींत स्थायी झालें आहे अशी) धारणा, (दुर्वास-शापानें आणलेला) विक्षेप, (पांचव्या अंकांत शकुंतला-त्यागाचें) आवरण, आत्मदर्शन, वात्सल्यसिद्धि या पायऱ्यांनीं या नाटकांत फलनिर्वहण होतें असें म्हटल्यास कांहीं ठोकळ रसिकांना ह्यांतील भव्यपणा रुचणार नाहीं आणि कांहीं अतिपंडितांना ही समीक्षा खपणार नाहीं. परंतु या दुहेरी करंटेपणांतून सुटण्यास दुसरा मार्ग नाहीं.

दिव्यकर्म आणि दिव्यजन्म यांचें स्वरूप यथा-शक्ति पाहणें आणि यथाशक्ति प्रकट करणें हें कवि-प्रतिभेचें मुख्य काम आहे. 'शाकुन्तला'चें हृदया-विष्करण करण्याकरितां तर भवभूतीच्या परिणत प्रज्ञेनें 'उत्तररामचरिता'सारखें हृदयद्रावक नाटक लिहिलें.







' अंतःकरणतत्त्वस्य दंपत्योः स्नेहसंश्रयात्

आनंदग्रंथिरेकोऽयमपत्यमिति कथ्यते ॥ '

'दांपत्याच्या अंतःकरणांतील स्नेहाला जी आनंदाची गांठ पडते ती अपत्यनामक प्राप्ति आहे'—असें भवभूतीनें जें म्हटलें आहे त्याचेंच ध्वन्यर्थानें 'शाकुन्तलां'त वर्णन केलें आहे. उलट वाच्यार्थानें त्याचेंच वैभव 'उत्तररामचरितां'त व 'कुमारसंभवां'त प्रकट झालें आहे.

शक्ति ही मूळ माता आहे. अनिवार्यपणें जीवाजीवांचें आकर्षण होणें ही दैवी घटना आहे, ईश्वरी लीला आहे. दुष्यन्त-शकुंतला यांचें सात्त्विक आकर्षण हें प्रथम शिवदर्शन आहे. कण्वांचा करुणावतार आणि दुर्वासांचा रुद्रावतार चवथ्या अंकांत होतो आणि आपन्नसत्त्व शकुन्तला आश्रमाच्या चतुरंग आशीर्वादासहित हस्तिनावतीकडे निघते, तें शिवतर कल्याणस्वरूप पाहण्याकरितां. परंतु तिला सर्व सतींना द्यावी लागणारी रौद्र सत्त्वपरीक्षा पांचव्या अंकांत द्यावी लागते. त्या परीक्षेंत दुष्यन्तहि उत्तीर्ण होतो हें दृश्य सहाव्या अंकांत दिसतें. सातव्या अंकांत शिवतम रसाचा प्रीतिसंगम आपणांस पाहावयास मिळतो.

यःशिवाय आणखी एक प्रचीती रसिकांना घेतां येईल. दुष्यन्ताचें बळ किंवा सत्त्व आर्तत्राणांत आहे, असें पहिल्या अंकांत म्हटलें आहे. तेंच आर्तत्राणाचें सामर्थ्य अंकाअंकांतून वाढत वाढत 'राक्षसदमनां'तून, 'इन्द्रियदमनां'तून 'सर्वदमनां'त साकार होतें.

'शाकुन्तलां'त अशा रीतीनें मातृत्वाचा, वात्सल्याचा जयजयकार आहे.[२] भगवंताची सृष्टिमाया गौतमी, शकुन्तला, मेनका आणि अदिति यांच्या रूपानें वात्सल्यवर्षाव करते आणि अधोमुख व बहिर्मुख पुरुषसत्त्वाला अंतर्मुख व उन्मुख करून आनंदपर्यवसानाकरितां पुनः सन्मुख होते. या सोहळ्याचा साक्षी होण्याकरितां जणूं

' यस्मिन् आत्मभवः परोऽपि पुरुषः

चक्रे भवायास्पदम् '

स्वयंभूच्या पलीकडील पुरुषोत्तम तेजस्वी दांपत्याच्या पोटीं येऊन खऱ्या आनंदभवाचा अनुभव घेतो. तीच ईश्वरी कृपा, अष्टभुजा होऊन ( प्रत्यक्षाभिः प्रपन्ना तनुभिः अवतु वस्ताभिरष्टाभिरेषा ) प्रत्यक्ष अनुभवाला येणारी अष्टांग माया परमवात्सल्यानें आपणा सर्वांचें रक्षण करो.

---

२. सुप्रसिद्ध समाजशास्त्रज्ञ ब्रिफाल (Briffault) यांचें पुढील अवतरण या दृष्टीनें उल्लेखनीय आहे :

"Honour to those who can be mothers not in the flesh alone, but in the spirit, who choose, praise and encourage aright, not only in that function of sexual selection which has always been theirs, but in the selection also of what is truest and best in the complex aims, ideals and efforts of Humanity "—' The Mothers ', Vol. III, page 520.

---

## एव्हरेस्ट शिखरावर मानवी वात्सल्याची खूण !

" २९ मे १९५३ ला मीं एव्हरेस्ट शिखरावर पाऊल ठेवल्यावर माझ्या मनांत पहिला विचार ईश्वराविषयीं आला. सहा वेळां अपयश आल्यानंतर आतां माझा दीर्घकालाचा मनोरथ त्याच्या कृपेनें सफल झाला होता. आमच्या बौद्धधर्मानुसार मीं माझ्याबरोबर नेलेल्या वस्तू शिखरावर ठेवून ईश्वराला अर्पण केल्या. माझ्या अवजड पोशाखामुळें मला गुडघे टेंकून प्रार्थना करतां येईना. मीं मनांतल्या मनांतच प्रार्थना केली. परमेश्वराला तेथें शिखरावर वाहिलेल्या वस्तू म्हणजे बिस्किटें, साखरेचे खडे आणि एक साधा लहानसा निळ्या पेन्सिलीचा तुकडा. माझी सर्वांत धाकटी मुलगी निमा हिनें मी घरून निघण्यापूर्वी, आपला अत्यंत आवडता असा पेन्सिलीचा तुकडा देऊन मला सांगितलें होतें कीं, 'एव्हरेस्टवर हा तुकडा माझा म्हणून देवाला वाहा.' तो पेन्सिलीचा तुकडा देवाला भेट म्हणून तेथें ठेवतांना हिलरीला मीं तो दाखविला. हिलरी तें पाहून मोकळेपणानें हंसला. त्याला माझ्या या नैवेद्याचा अर्थ समजला होता. "

—तेनसिंग नोर्के, ' टाइम्स ऑफ इंडिया ' १६।७।५३








आचार्य स. ज. भागवत

# आचार्य जावडेकरांचा सत्याग्रही समाजवाद

पेशवाईच्या अस्तापासून लोकमान्य टिळकांच्या निधनापर्यंतच्या शतकांत हिंदुस्थानांत आणि विशेषतः महाराष्ट्रांत ज्या ज्या वैचारिक चळवळी झाल्या त्यांचें आचार्य जावडेकर यांनीं या ग्रंथांत केलेलें विश्लेषण आणि मूल्यमापन आतां सर्वमान्य झालेलें आहे. लोकमान्य टिळकांच्या मृत्यूनंतर भारतीय स्वातंत्र्याच्या लढ्याचें नेतृत्व महात्मा गांधी यांच्याकडे गेलें. 'आधुनिक भारता'च्या पहिल्या आवृत्तींत साहजिकच या नेतृत्वाची विस्तृत चर्चा करण्यांत आली होती. तथापि स्वातंत्र्यप्राप्तीचें कार्य त्या वेळीं पुरें झालेलें नसल्या कारणानें ती चर्चा कांहीं ठिकाणीं भविष्याचा अंदाज घेणारी झाली होती. 'आधुनिक भारता'च्या आजच्या नव्या आवृत्तींत गांधीयुगाचें संपूर्ण समालोचन आलेलें आहे. स्वातंत्र्यप्राप्तीबरोबर गांधींचें प्रत्यक्ष नेतृत्वहि संपलें. यामुळें आधुनिक भारताचें पारतंत्र्यापासून स्वातंत्र्यापर्यंतचें एक संपूर्ण महाभारत आतां ऐतिहासिक दृष्ट्या आपणांसमोर उभें झालेलें आहे. याचें चित्रण या नव्या आवृत्तींत पूर्णांशानें वाचकांस पाहावयास मिळेल. या दृष्टीनें 'आधुनिक भारत' हा ग्रंथ आतां पूर्ण झाला आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. स्वतंत्र भारताची समाजरचना कोणत्या पद्धतीनें व्हावी याची तात्त्विक रूपरेषा आचार्य जावडेकर यांनीं आपल्या नव्या आवृत्तींत दिली आहे. त्याची सत्यता अथवा व्यवहार्यता भविष्यकाळ ठरवील. तथापि भारतीय स्वातंत्र्य-संग्रामाचें त्यांचें विवेचन आतां सर्वमान्य होऊं शकेल असा मला विश्वास वाटतो.

आचार्य जावडेकर यांची भूमिका इतिहासकाराची अथवा केवळ तत्त्वचिंतकाची नाहीं. भारतीय स्वातंत्र्याच्या राष्ट्रीय प्रेरणेशीं ते स्वतः बाळपणापासून समरस झालेले आहेत. शिवाय, त्यांची मानसिक प्रकृति सांप्रदायिक नाहीं. त्यामुळें भारतीय स्वातंत्र्याच्या सर्वांगीण चळवळींचा ते पुरस्कार करीत आले आहेत. सामाजिक सुधारणा आणि राष्ट्रीय स्वातंत्र्य यांचा त्यांनीं कधीं परस्पर-विरोध मानला नाहीं. उलट, या दोन्ही गोष्टी परस्परानुकूल आहेत अशीच त्यांची स्वतःची बाळपणापासून निष्ठा आहे. तथापि, परतंत्र राष्ट्राचें संजीवन स्वातंत्र्यप्राप्तीनेंच होऊं शकतें, हा त्यांचा दृढ विश्वास होता. यामुळें सामाजिक सुधारणेच्या एकेरी आग्रहानें ते राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या मुख्य लढ्यापासून कधींहि पराङ्मुख झाले नाहींत. गांधीयुगाच्या प्रारंभीं त्यांनीं सार्वजनिक जीवनांत स्वतः प्रवेश केला तोंपर्यंत त्यांची विद्यासाधनाच चालू होती. या विद्यार्थिदशेंत त्यांच्यावर टिळक आणि आगरकर या दोघांचेहि सारखेच संस्कार झालेले होते. यामुळें गांधीयुगाच्या स्वागताची त्यांची पूर्वतयारी झालेली होती. ते स्वतः अर्थशास्त्र व राजकारण विषयांचे अभ्यासक असल्यामुळें, त्यांनीं समाजवाद [illegible] राज्यक्रांति यांचा अभ्यास प्रारंभिलेला होताच. पण त्यांच्या बुद्धीला तत्त्वज्ञानाचीहि आवड असल्यामुळें, त्यांनीं आपल्या महाविद्यालयीन जीवनांत पौरस्त्य व पाश्चात्त्य तत्त्वज्ञानाचा अभ्यास आरंभिलेला होता. तत्त्वज्ञानाच्या बैठकीवरून सामाजिक जीवनाच्या सर्व व्यवहारांचें परीक्षण करण्याची पात्रता या अध्ययनप्रवृत्तीमुळेंच त्यांना सहजच लाभली. एवढ्या व्यापक शिदोरीसह त्यांनीं गांधीयुगाच्या प्रारंभीं महाराष्ट्राच्या राजकीय व शैक्षणिक जीवनांत प्रवेश केल्यामुळें

---

'गीतारहस्यानंतरचा थोर ग्रंथ' असा ज्याचा महाराष्ट्राचे थोर तत्त्वचिंतक कै. वा. म. जोशी यांनीं गौरव केला तो **आचार्य शं. द. जावडेकर** यांचा ग्रंथराज 'आधुनिक भारत' याची सुधारून व भर घालून वाढविलेली **द्वितीय आवृत्ति** येत्या **ऑगस्ट १** ला टिळक-पुण्यतिथीच्या दिवशीं **सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेतर्फे** प्रकाशित होणार आहे. त्या ग्रंथाला **आचार्य भागवत** यांनीं लिहिलेली प्रस्तावना त्यांच्या व प्रकाशकांच्या कृपेनें येथें प्रस्तुत लेखरूपानें उद्धृत केली आहे.—का. सं.



अनुक्रमणिका






महाराष्ट्रांतील तरुण कार्यकर्त्यांमध्यें त्यांना वैचारिक उच्च स्थान निर्माण झालें. ग्रंथलेखन, अध्यापन आणि वृत्तपत्रीय संपादन या तीन मार्गांनीं त्यांनीं आपलें वैचारिक मार्गदर्शनाचें कार्य अव्याहत चालू ठेवलें. १९३०, १९३२ व १९४२ च्या स्वातंत्र्याच्या सामुदायिक लढ्यामध्यें त्यांनीं देहदंडहि सोसला. अशा रीतीनें त्यांनीं आपल्या विचारांना आचाराचें योग्य पाठबळहि दिलेलें आहे. असहकारितेच्या प्रारंभीं इस्लामपूर येथें त्यांनीं अस्पृश्यतानिवारणाच्या कामाला धैर्यानें हात घातला व पुण्याला आल्यावर एका अस्पृश्य विद्यार्थ्याला त्यांनीं जाहीरपणें आपल्या कुटुंबांत एकत्र राहण्यास घेतलें. यामुळें आचार्य जावडेकरांचा राष्ट्रवाद हा सर्वांगीण क्रांतिकारक बनलेला आहे. राष्ट्रवादी तत्त्वज्ञानें वा चळवळी पुष्कळ वेळां एकांगी, हटवादी आणि संकुचित झालेल्या दिसतात. अशी विकृति जावडेकरांच्या विचाराला वा आचाराला जडलेली कोणीं पाहिली नाहीं. राजकीय विचाराला अतिरिक्त पक्षनिष्ठेनेंहि विकृति येऊं शकते. बहुधा राजकारणांतील पक्षभेद हे एक प्रकारच्या बौद्धिक वकिलीनें डागळलेले असतात. त्यांचें लिखाण सत्यनिष्ठेपेक्षां पक्षनिष्ठेवर आधारलेलें असतें. आचार्य जावडेकर यांचें वृत्तपत्रीय संपादन देखील या दृष्टीनें आदर्श मानावें लागेल. त्यांनीं आपल्या आयुष्यांत आपल्या बौद्धिक निष्ठेशीं कधींहि प्रतारणा होऊं दिली नाहीं. संकुचित पक्षनिष्ठेचा स्वीकार करून आपल्या बौद्धिक स्वतंत्रतेचा त्यांनीं कधींच बळी दिला नाहीं. यामुळें त्यांच्या लेखनांत ओजस्वी तत्त्वनिष्ठा सर्वत्र भरून राहिलेली आढळते. महाराष्ट्राच्या अलीकडच्या कित्येक वर्षांच्या लेखन-इतिहासांत आचार्य जावडेकरांना अलौकिक स्थान द्यावें लागेल. भारतीय स्वातंत्र्यपर्वाचा रोमहर्षक इतिहास लिहिण्यासाठीं महाराष्ट्राला आचार्य जावडेकरांसारखा ध्येयनिष्ठ आणि आचारशुद्ध तत्त्वज्ञ लेखक लाभला हें महाराष्ट्राचें विशेष सौभाग्य होय.

आचार्य जावडेकर यांच्या राष्ट्रवादाला आणखी दोन बाजू आहेत. एका बाजूनें त्यांनीं आपला राष्ट्रवाद आध्यात्मिक भूमीवर स्थिर केला आहे आणि दुसऱ्या बाजूनें त्या राष्ट्रवादाला त्यांनीं समाजवादाची दिशा जोडून दिली आहे. त्यांच्या समन्वयबुद्धीनेंच त्यांना ही गोष्ट साध्य करतां आली हें उघडच आहे. या ठिकाणीं समन्वय या शब्दाचा नीट अर्थ समजून घेतला पाहिजे. समन्वय म्हणजे तडजोड नव्हे. प्रसंगसाधु राजकारणी ज्याप्रमाणें वाटेल त्या तडजोडी व्यवहारांत करीत असतात त्याप्रमाणेंच अशा राजकारणाची वकिली करणारे संधिसाधु लेखकहि वैचारिक क्षेत्रांत वाटेल त्या तडजोडी दाखविण्यास पुढें येतात. तडजोडीनें राजकारणें जशीं फसतात तशींच तडजोडीचीं तत्त्वज्ञानेंहि अंतीं लज्जित झाल्याशिवाय राहत नाहींत. या प्रकारच्या तडजोडीला समन्वय हें नांव देतां येणार नाहीं. तो शुद्ध संधिसाधूपणा होय. समन्वय ही एक उच्च ज्ञानप्रक्रिया आहे. या प्रक्रियेंत जीवनांतील विविध आणि विरोधी विभागांतहि जें एकत्वदर्शक सत्य लपलेलें असतें तें शोधक बुद्धीनें हुडकून काढावयाचें असतें; आणि जीवनाची शक्ति विविधतेनें गांगावून जाऊं नये वा व्यर्थ विरोधानें क्षीण होऊं नये यासाठीं तिला सफलतेच्या मार्गावर पुढें जाण्यासाठीं दिग्दर्शन करावयाचें असतें. अशा समन्वयशोधक बुद्धीची समाजाला नेहमींच गरज असते. ही बुद्धि म्हणजे केवळ तर्कबुद्धि नव्हे. या बुद्धींत तार्किक विश्लेषणाची शक्ति गृहीत धरलेली असली तरी तेंच तिचें मुख्य रूप नव्हे. तार्किक विश्लेषणानें स्पष्ट दिसून आलेल्या असत्य अंशांचा कठोरपणानें त्याग करण्याचें सामर्थ्य अशा समन्वयबुद्धीला असावें लागतेंच. परंतु असत्य अंशांच्या त्यागानंतर जुन्या सत्य अंशांचा एका नव्या उच्च पातळीवर एकत्र समावेश करून नव्या व्यापक सत्याचें दर्शन घेण्याची अथवा असें अभिनव सत्य निर्माण करण्याची शक्ति हाच समन्वयबुद्धीचा प्राण होय. आचार्य जावडेकरांच्या बुद्धींत ही समन्वयशक्ति आहे असें मला म्हणावयाचें आहे. ही समन्वयबुद्धि दोन पातळींवर निर्माण झालेली आढळते. सामाजिक जीवनांत नवे आदर्श निर्माण करणाऱ्या व समाजाला त्या नव्या आदर्शाकडे स्वतःच्या तपस्येनें खेंचून नेणाऱ्या ऋषींचा वर्ग ही एक पातळी








# आचार्य जावडेकरांचा सत्याग्रही समाजवाद

अशा जीवनद्रष्ट्या ऋषींच्या विचारांचा बौद्धिक उलगडा करून दाखविणाऱ्या तत्त्वज्ञ आचार्यांचा वर्ग ही दुसरी पातळी. आचार्य जावडेकर हे या दुसऱ्या पातळींतील एक श्रेष्ठ तत्त्वज्ञ म्हणून महाराष्ट्रांत सदैव मानले जातील असा मला दृढ भरंवसा आहे.

अध्यात्मवाद म्हटला म्हणजे परलोकपरायणता, ऐहिकपराङ्मुखता, व्यक्तिपरता, समाजविन्मुखता, एकांतिक चिन्तनशीलता, भौतिकाविषयीं उदासीनता इत्यादि गोष्टींचीं चित्रें सामान्यतः डोळ्यांसमोर उभीं राहतात; आणि म्हणून समाजजीवनाच्या दृष्टीनें अध्यात्मवाद ही एक प्रगतिविरोधी वृत्ति आहे, तो एक पलायनवाद आहे, असें पुष्कळ क्रांतिकारकांचें मत झालेलें आहे. अध्यात्माचा जगांतील इतिहास पाहिला तर असें मत बनण्याला अध्यात्मवादी लोकांनीं पुष्कळ जागा करून ठेवलेली आहे हें नाकारतां येणार नाहीं. विशेषतः राजकीय सत्ता आणि आर्थिक श्रेष्ठता उपभोगणाऱ्या वर्गांनीं आपलें आधिपत्य टिकविण्यासाठीं अध्यात्मवादी विचारांचा आणि कल्पनांचा आतांपर्यंत खूप दुरुपयोग केलेला आहे, हें देखील कबूल केलें पाहिजे. तथापि एवढ्यानें अध्यात्मवाद हा मुळांतच समाजविरोधी आहे असें मानणें योग्य होणार नाहीं. कारण अध्यात्मवादी पुरुषांनीं जगामध्यें उदात्ततेचे आदर्श वेळोवेळीं निर्माण केले आहेत आणि त्या आदर्शांकडे जाण्यासाठीं समाजमनाला आवाहन केलें आहे. त्या आदर्शांसाठीं कित्येक अध्यात्मवादी पुरुषांनीं आपल्या सर्वस्वाचें बलिदानहि केलेलें आहे. म्हणून अध्यात्मवादाची विकृति झाडून काढून शुद्ध अध्यात्माचें स्वरूप समाजापुढें वारंवार मांडण्याची गरज आहे. सर्वस्वीं हीनदीन झालेल्या भारतीय समाजांत आशेचा आणि उत्साहाचा नवा आवेश निर्माण करण्यासाठीं आधुनिक भारतांत गेल्या शंभर-दीडशें वर्षांत जे थोर पुरुष झाले त्यांनीं आपली स्फूर्ति अध्यात्मांतूनच मिळविली होती असें दिसून येतें. या अध्यात्माला रूढ विकृतींपासून वेगळें करण्यासाठीं त्यांनीं 'कर्मयोगी अध्यात्म' असें मुद्दाम नवीन नांव दिलें. या कर्मयोगी अध्यात्माची योग्य चिकित्सा आचार्य जावडेकरांनीं आपल्या ग्रंथांत जागोजाग केली आहे. व्यक्तीनें स्वतःच्या सुखांत वा विलासांत मग्न न राहतां, समाजविकासाच्या कार्यांत आपलें व्यक्तित्व विरवून टाकलें पाहिजे आणि त्यांतूनच आपलें व्यापक व्यक्तित्व निर्माण केलें पाहिजे हा या कर्मयोगी अध्यात्माचा मुख्य संदेश आहे. हें अध्यात्म बुद्धिप्रामाण्याच्या विरोधी नाहीं. फक्त बुद्धीचा विकास केवळ तर्कशक्तीनें होत नाहीं, त्यासाठीं भावशुद्धीची आवश्यकता असते, एवढेंच या अध्यात्माचें म्हणणें आहे. सामाजिक समतेचा सर्वांगीण विकास हें या कर्मयोगी अध्यात्माचें एकमेव साध्य मानलेलें आहे आणि या साध्यासाठीं समाजानें अधिकाधिक शुद्ध साधनांचा स्वीकार केला पाहिजे, असा या अध्यात्मवादाचा विशेष कटाक्ष आहे. आचार्य जावडेकरांनीं आपल्या राष्ट्रवादाला कर्मयोगी अध्यात्माचा आधार दिल्यामुळें तो राष्ट्रवाद समाजवादाच्या दिशेकडे स्वाभाविकच वळला आहे. भारतीय राष्ट्रवादाची प्रेरणा भारतीय जनतेच्या उद्धाराची असल्यामुळें येथील राष्ट्रवादाला विकृत स्वरूप लाभणें शक्य नाहीं, असा आचार्य जावडेकरांचा मुख्य सिद्धान्त आहे. भारतीय स्वातंत्र्याच्या इतिहासाकडे पाहिलें असतां हा त्यांचा सिद्धान्त सामान्यतः बरोबर ठरला आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. कोणताहि वाद सामान्य जनतेपासून दूर गेला तर तो तेव्हांच विकृत होतो. सामान्य जनतेच्या जीवन प्रश्नांशीं साथ राखणारा कोणताहि वैचारिक पंथ अंतीं शुद्ध झाल्याखेरीज राहत नाहीं. राष्ट्रवाद विकृत झाला असतां त्याला फॅसिझमचें स्वरूप येतें हें आपण नुकतेंच पाहिलें आहे. या फॅसिझमलाहि अध्यात्मवादाचें मोठें आकर्षण असतें ही गोष्ट खोटी नाहीं. पण फॅसिझमची ही विकृति जनताद्रोहामुळेंच निर्माण होत असते हेंहि आतां उघड झालें आहे. आचार्य जावडेकर यांचा आध्यात्मिक राष्ट्रवाद जनतानिष्ठ राहिल्यामुळें त्याला समाजवादाचें मधुर स्वरूप लाभलें आहे.

राष्ट्रवाद आणि समाजवाद यांच्या परस्परसंबंधांचा विचार आचार्य जावडेकर यांनीं असह-







कार-युगाच्या प्रारंभींच केलेला आढळतो. किंबहुना गांधींच्या सत्याग्रह-तत्त्वज्ञानाचा तात्त्विक स्वीकार करण्यापूर्वींच आचार्य जावडेकर यांनीं समाजवादाचा स्वीकार केला होता. आपल्या ' राजनीतिशास्त्रपरिचय ' नांवाच्या पहिल्या मोठ्या ग्रंथांत त्यांनीं समाजवादाविषयीं चांगलें विवेचन केलेलें आढळेल. त्यानंतर त्यांनीं महात्मा गांधींच्या सत्याग्रह-तत्त्वज्ञानाचा पूर्ण विचारान्तीं स्वीकार केला आणि तेव्हांपासून सत्याग्रही समाजवादाचें आपलें नवें तत्त्वज्ञान ते पसरवीत आले आहेत. पहिल्या महायुद्धानंतर हिंदुस्थानांत गांधीवाद आणि मार्क्सवाद हे दोन नवे विचारसंप्रदाय परस्परांशीं झगडत आले आहेत. या दोन्हीहि विचारांचा समन्वय इष्ट आणि शक्य आहे अशी आचार्य जावडेकरांची दृढ श्रद्धा आहे. भारतांत विकसित होत आलेल्या आध्यात्मिक राष्ट्रवादाचें सत्याग्रही समाजवाद हें परिणत फळ आहे असें त्यांचें ठाम मत आहे. स्वातंत्र्याच्या प्राप्तीनंतर भारतीय जनतेची सर्वांगीण विकासाची चळवळ सत्याग्रही समाजवादाच्या दिशेनेंच होत राहील असा त्यांचा विश्वास आहे. सत्याग्रही समाजवादाच्या सिद्धान्तांचें आचार्य जावडेकर यांनीं गेलीं दोन तपें जें विवेचन चालविलें आहे, त्याचा निष्कर्ष आधुनिक भारताच्या नव्या आवृत्तींत सुस्पष्टपणें पुन्हा एकदां मांडण्यांत आला आहे. हें सर्व विवेचन मौलिक विचारानें भरलेलें आहे असा माझा अभिप्राय झाला आहे. महात्मा गांधींच्या मृत्यूनंतर गांधीवादी विचाराचें सामर्थ्य लोपतें कीं काय अशी एक भीति उत्पन्न झाली होती. निष्क्रियता आणि सांप्रदायिकता यांनीं बहुतेक गांधीवादी ग्रासल्याचें दिसत होतें. परंतु विनोबाजींच्या रूपानें भारतांत सत्याग्रहाचें अथवा सर्वोदयाचें नवें तेजस्वी स्वरूप प्रकट होऊं लागलें आहे. आणि समाजवादी विचार सत्याग्रहाचें तत्त्व अधिकाधिक आत्मसात् करूं लागला आहे. यामुळें भारतांत यापुढच्या काळांत आचार्य जावडेकर म्हणतात त्याप्रमाणें सत्याग्रही समाजवादाच्या प्रस्थापनेला अनुकूल परिस्थिति निर्माण होत चालली आहे असेंहि मला वाटतें.

महात्मा गांधींचें सत्याग्रहाचें तत्त्वज्ञान अहिंसक समाजरचनेच्या निर्मितीसाठीं पुढें आलेलें आहे. त्याची दृष्टि पारलौकिक नाहीं, ऐहिकच आहे. सत्याग्रह हा संन्यासमार्ग नसून तो प्रखर सामाजिक कर्मयोगच आहे. त्याची बैठक संकुचित राष्ट्रवादाची नाहीं. तो विश्वमानवाचें एकत्व मानणारा व त्यासाठीं सामाजिक जीवनाच्या सर्व क्षेत्रांत समतेची प्रस्थापना करणारा मानवतावादी विचार आहे. यामुळें मानवामानवामध्यें भेद पाडणाऱ्या सर्व संस्कारांचा त्याला निरास करावयाचा आहे. राजकीय पारतंत्र्य, आर्थिक विषमता आणि सांस्कृतिक श्रेष्ठ-कनिष्ठता यांचा सामाजिक जीवनांतून संपूर्ण विलय केल्याशिवाय अहिंसक समाजाची निर्मिति होणार नाहीं. अहिंसक समाजनिर्मितीच्या मार्गातील हे अडथळे दूर करण्यासाठीं सत्याग्रह-तत्त्वज्ञानाला मोठमोठ्या सामाजिक चळवळी हातीं घ्याव्या लागतील.

महात्मा गांधींनीं भारतांत सत्याग्रहाचा जो दीर्घ संग्राम चालविला त्याचें स्वरूप त्यांनीं स्वतःच ठरवून घेतलें होतें. ते अहिंसाधर्माचे संपूर्ण पुरस्कर्ते असले तरी त्यांनीं भारतीय जनतेपुढें ठेविलेला अहिंसामार्ग जातीय ऐक्य आणि स्वराज्यप्राप्ति या दोन क्षेत्रांपुरतांच प्रारंभीं मर्यादित केलेला होता. ' Hinduism and Non-violence ' या मथळ्याखालीं १९२४ सालीं आपल्या ' यंग इंडिया ' पत्रांत लिहितांना त्यांनीं पुढील उद्गार काढले आहेत :

" But I never presented to India that extreme form of Non-violence, if only because I do not regard myself fit enough to redeliver that ancient message. Though my intellect has fully understood and grasped it, it has not as yet become part of my whole being. My strength lies in my asking people to do nothing that I have not tried repeatedly in my own life. I am then asking my countrymen today to adopt non-violence as their final creed, only for the purpose of regulating the

relations between the different races, and for the purpose of attaining Swaraj. Hindus and Mussulmans, Christians, Sikhs and Parsis must not settle their differences by resort to violence, and the means for the attainment of Swaraj must be non-violent. This I venture to place before India, not as a weapon of the weak but of the strong."

गांधींचा सामाजिक अहिंसामार्ग क्रमाक्रमानें विकसित होत गेलेला आढळतो. आत्मक्लेशानें विरोधकाचें हृदयपरिवर्तन घडवून आणणें हें त्या मार्गाचें मुख्य सूत्र सदैव कायम राहिलें असलें, तरी विरोधकाशीं ठेवावयाच्या संबंधांत बदल झालेला दिसून येतो. पहिल्या महायुद्धाच्या वेळीं त्यांची भूमिका युद्धसहकाराची होती. दुसऱ्या महायुद्धाच्या वेळीं शेवटीं ती संपूर्ण असहकाराची बनली आणि युद्धाचा कोणत्याहि प्रकारें स्वीकार करूं नये, सर्व प्रकारच्या युद्धांशीं भारतानें ( भारताचें प्रतिनिधित्व करणाऱ्या राष्ट्रीय सभेनें ) कायमचा असहकार पुकारावा अशी एकांतिक अहिंसेची झाली. हें प्रसिद्धच आहे. परंतु या त्यांच्या व्यक्तिगत विकासाबरोबर त्यांचे अनुयायी देखील साथ करूं शकले नाहींत; आणि यामुळें भारतीय स्वातंत्र्याच्या अखेरच्या लढ्यांत गांधीजींची शुद्ध अहिंसा जनतेला आचरितां आली नाहीं. स्वातंत्र्यप्राप्तीसाठीं साधन म्हणून राष्ट्रीय सभेनें स्वीकारलेला शांतताप्रधान मार्गहि खरोखर अहिंसा-धर्म म्हणून नव्हे तर राजकारणाचें व्यवहार्य धोरण म्हणूनच स्वीकारलेला ठरला. तथापि, भारतीय स्वातंत्र्यसंग्रामाचें नेतृत्व अखेरपर्यंत महात्मा गांधी यांच्या हातींच राहिलें व ते स्वतः शुद्ध अहिंसेचे निष्ठावंत उपासक असल्यामुळें त्यांच्या पुण्याईचा लाभ भारतीय जनतेला झाला. ' Satyagraha never fails.', 'One perfect Satyagrahi is enough to vindicate truth.' हें गांधींचें म्हणणें भारतीय संग्रामापुरतें सार्थ ठरलें.

जातीय ऐक्यासंबंधीं गांधीजींच्या अहिंसा-मार्गाचें अनुसरण भारतीय जनतेकडून मोठ्या प्रमाणांत होऊं शकलें नाहीं. मुसलमान जनतेचा धर्मवेडेपणा, तिच्यांतील राजकीय जागृतीचा अभाव, वैचारिक शिक्षणाचा मागसलेपणा या दोषांचा पुरेसा निचरा न झाल्यामुळें जातीय ऐक्याची प्रस्थापना न होतां खंडित स्वराज्याची योजना राष्ट्रीय सभेच्या पुढाऱ्यांना अगतिक होऊन स्वीकारावी लागली. या अपयशाची जबाबदारी मुसलमान जनतेप्रमाणें हिंदु जनतेवरहि आहेच. हिंदूंची जातिसंस्था, त्यांच्यामधील अस्पृश्यतेची रूढि, सोंवळेपणाच्या कल्पना आणि उच्चनीच-भावाचा अट्टहास या दोषांमुळें भारतीय राष्ट्रीयत्व अभंग होऊं शकलें नाहीं. ब्रिटिश मुत्सद्द्यांनीं भारतीय राष्ट्रीयत्वाचा हा दुबळेपणा वाढविण्याला मदतच केली आणि जातीयवादी पुढाऱ्यांना हाताशीं धरून त्यांनीं भारतीय राष्ट्रवादाचें सामर्थ्य खच्ची करण्याचा कसून प्रयत्न केला. या सर्व परिस्थितीमुळें गांधीजींना या क्षेत्रांत सामाजिक दृष्ट्या मोठें यश मिळूं शकलें नाहीं. तथापि गांधींनीं हिंदु-मुस्लिम-ऐक्याच्या प्रस्थापनेसाठीं आ-मरण परिश्रम केले आणि आपल्या अहिंसा-धर्माचें आचरण करीत करीतच त्यांनीं आपला देहहि बळी दिला. यामुळें गांधींच्या जीवनांत त्यांनीं स्वतःपुरता तरी आपला अहिंसामार्ग कधीं सोडला नाहीं असेंच म्हणावें लागेल. सामुदायिक यशाच्या बाबतींत कमतरता आली असली तर तो ऐतिहासिक परिस्थितीचा परिपाक मानावा लागेल.

परतंत्र राष्ट्रानें निःशस्त्र स्थितींत आपल्या स्वातंत्र्याची प्राप्ति कशी करून घ्यावी याचा एक व्यवहार्य आदर्श गांधीजींच्या प्रयत्नामुळें जगापुढें आला आहे यांत शंका नाहीं. गांधीजींची क्रांतिशास्त्रांतलि ही महत्त्वाची भर म्हणावी लागेल. तथापि सध्यांच्या जागतिक परिस्थितींत सशस्त्र सैन्य न बाळगतां राष्ट्रीय सरकार कसें चालवितां येईल याचा उपाय सत्याग्रह-तत्त्वज्ञानानें अद्यापि दाखविलेला नाहीं. यामुळें स्वतंत्र भारतांतील राष्ट्रीय सरकारला चांचपडतच जावें लागत आहे. आचार्य जावडेकर यांचें असें म्हणणें आहे कीं, आजच्या स्थितींत सत्याग्रही लोकांना राष्ट्रीय सरकार हातीं घेतां येणार नाहीं. त्यांनीं







जनतेंत जाऊन सत्याग्रह-तत्वज्ञानाचा प्रचार करावा आणि जनतेचे दैनंदिन प्रश्न हातीं घेऊन ते अहिंसामार्गानें सोडविण्याची साधना करावी. भारतांतील राष्ट्रीय सरकार लोकशाही समाजवादी तत्त्वज्ञान मानणाऱ्यांच्या हातीं असावें म्हणजे त्या सरकारची प्रगति अहिंसेच्या दिशेनें होत राहील. राज्यसंस्था ही दंडसंस्था असल्यामुळें तिला अहिंसक स्वरूप द्यावयाचें म्हणजे तिचें संपूर्ण विसर्जनच करावयाचें. सत्याग्रह-तत्त्वज्ञान हें या अर्थानें अराज्यवादी आहे. हा अराज्यवाद म्हणजेच गांधींचें रामराज्य होय. परंतु या रामराज्याच्या ध्येयाकडे जाण्यासाठीं कांहीं टप्पे साधावे लागतील. परकीय राज्यसंस्थेपेक्षां स्वकीय राज्यसंस्था ही अहिंसेला जवळ आहे. स्वराज्यांतहि लोकशाही स्वराज्य हें अहिंसावृत्तीला अधिक पोषक आहे. त्याचप्रमाणें भांडवलशाहीप्रधान लोकशाहीपेक्षां समाजवादी लोकशाही ही समाजाला अधिक अहिंसेकडे नेणारी ठरेल. म्हणून आजच्या स्थितींत भारताचें व्यवहार्य राजकीय ध्येय लोकशाही समाजवाद हें असलें पाहिजे असें आचार्य जावडेकरांनीं या ग्रंथांत शेवटीं प्रतिपादिलें आहे. मात्र या समाजवादी विचारानें सत्याग्रह-तत्त्वज्ञानाचें अंतिम श्रेष्ठत्व मान्य केलें पाहिजे व आपला सर्व व्यवहार करीत असतां अधिकाधिक अहिंसाधर्माचा आचार केला पाहिजे असें त्यांचें आग्रहाचें म्हणणें आहे. समाजवादाला सत्याग्रहाचें अनुयायित्व करावयास लावणें हें गांधीवादाचें यापुढील नियोजित कार्य समजलें पाहिजे, असा आचार्य जावडेकरांचा निश्चित निष्कर्ष आहे. हें कार्य साधावयाचें असेल तर गांधीवादानें समाजवादाशीं विरोध सोडून दिला पाहिजे व राज्यसंस्थेचा सर्व व्यवहार समाजवादी विचारकांच्या हातीं सोंपविण्यास तयार झालें पाहिजे असें जावडेकरांचें म्हणणें आहे. सामान्यतः, जावडेकरांचे हे निष्कर्ष निरपवाद आहेत असें माझें मत झालें आहे. राज्यसंस्था चालविणाऱ्यांनीं आपण गांधीवादी आहोंत हें म्हणण्यानें विचारांचा गोंधळ माजत आहे व ढोंगाला उत्तेजन येत आहे. त्यापेक्षां सरळपणानें त्यांनीं आपण समाजवादी आहों असें म्हणण्यास प्रारंभ करावा म्हणजे तत्त्वनिष्ठा शुद्ध राहील आणि व्यवहारहि निर्मळ होईल.

आशियांतील जनतेचे प्रश्न लोकशाही समाजवादाच्या स्वीकाराशिवाय सुटणार नाहींत, ही गोष्ट आतां सर्वच विचारवंतांना मान्य होत चालली आहे. आशियांतील जुन्या समाजसंस्था सर्वत्र कोसळत आहेत. नवी समतेवर आधारलेली मानवतावादी संस्कृति आशियांत निर्माण होण्यानेंच जगांतील युद्धसंस्था विराम पावूं शकेल. भारत आणि पाकिस्तान या दोनहि राष्ट्रांतील जनतेचे प्रश्न लोकशाही समाजवादाच्या स्वीकारानेंच सुटणार आहेत. संकुचित जातीयवादी पुढारीपणानें हिंदूंचे काय किंवा मुसलमानांचे काय कोणतेच प्रश्न कायमचे सुटणार नाहींत. म्हणून भारतानें लोकशाही समाजवादाचा स्वीकार केला तर त्याचा पाकिस्तानवरहि अनुकूल परिणाम झाल्याशिवाय राहणार नाहीं. पाकिस्तानांतहि जातीयवादी पुढारीपण मागें पडून लोकशाही समाजवादी पुढारीपण निर्माण होण्याची आवश्यकता आणि शक्यता आहे. असें झाल्यानंतर भारत आणि पाकिस्तान यांचे पुनः मैत्रीचे संबंध निर्माण झाल्याशिवाय राहणार नाहींत.

महात्मा गांधींनीं निर्माण केलेलीं सामाजिक ध्येयें मानवाला नव्या युगांत नेण्याला समर्थ ठरणारीं आहेत यांत शंका नाहीं. मात्र त्यासाठीं गांधीजींच्याप्रमाणेंच स्वतंत्र विचार करणारे व जनतेच्या रोजच्या प्रश्नाशीं समरस होणारे नवे कार्यकर्ते निर्माण व्हावयास पाहिजेत. विचारांचे संप्रदाय बनले म्हणजे त्यांचें सामर्थ्य क्षीण होतें आणि कर्मठपणाच्या नादीं लागून समाजाची हानि करण्यालाहि ते कारणीभूत होतात असा जगाचा इतिहास आहे. संप्रदायाच्या व कर्मठपणाच्या आपत्तींतून गांधींचा विचार सुटूं शकेल अशा आशा पूज्य विनोबाजींच्या अलीकडच्या तेजस्वी चळवळीनें निर्माण झाल्या आहेत. जवाहरलाल, जयप्रकाश आणि विनोबाजी यांचें सहकार्य झालें तर आचार्य जावडेकर म्हणतात त्याप्रमाणें भारतांत सत्याग्रही समाजवादाची प्रतिष्ठापना झाल्याशिवाय राहणार नाहीं, असा मला भरंवसा वाटतो.












श्री. यशपाल जैन—अनु. : श्री. श्रीपाद जोशी.

# • • मौ ल वी सा हे ब

त्यांचें नांव होतें रहमतउल्ला खान; परंतु सर्व लहान-थोर मंडळी त्यांना 'मौलवीसाहेब' याच नांवानें संबोधीत असत. तें गांवहि सर्वसामान्यच होतें. त्यांत कांहीं वैशिष्ट्य नव्हतें. पक्की सडक नव्हती, वीज नव्हती किंवा दवाखानाहि नव्हता. परंतु तरी देखील मौलवीसाहेबांना त्या गांवाबद्दल फार जिव्हाळा वाटत असे. कारण त्यांचा जन्म तेथेंच झाला होता आणि त्याच ठिकाणीं ते लहानाचे मोठे झाले होते. त्या गांवाबद्दल त्यांना विशेष आकर्षण वाटण्याचें आणखी एक कारण होतें. तें असें कीं, त्यांचा एकुलता एक मुलगा करीम ऐन तारुण्यांत त्यांना तेथेंच सोडून देवाघरीं गेला होता. त्याच्या स्मरणार्थ त्यांनीं गांवाबाहेर एक लहानशी कबर बांधली होती. त्यामुळें सरकारी नोकरींतून मुक्त होतांच त्यांनीं त्या गांवांत एक शाळा सुरू केली व मोठ्या प्रेमानें मुलांना शिकविण्याचें काम ते करूं लागले. मुलांवर त्यांची अत्यंत ममता होती आणि मुलेंहि त्यांच्यावर मनापासून प्रेम करीत. त्यांना चिलीम भरून देणें, आपापल्या शेतांतील भाजीपाला त्यांना आणून देणें, सणावारीं घरीं होणारीं उत्कृष्ट पक्वान्नें आणून त्यांना तीं खाण्याचा आग्रह करणें वगैरे गोष्टींमध्यें मुलांना अपरिमित आनंद होत असे. मौलवीसाहेबांची वाणी अत्यंत मधुर होती आणि मुलांशीं वागतांना तर ते मेणाहूनहि मऊ होत. मुलांनीं कितीहि मोठी चूक केली तरी त्यांना मारण्याची गोष्ट तर राहूं द्याच; परंतु त्यांच्या तोंडून एखादा कठोर शब्दहि निघत नसे. ते मुलांचे गुरुजी असल्यामुळें सर्व गांवच त्यांच्याकडे आदरानें व आपलेपणानें पाहात असे. त्यांचें घराणेंहि त्या गांवांत अत्यंत प्रतिष्ठित समजलें जात असे. यामुळें त्यांचा तरणाबांड मुलगा करीम जेव्हां त्यांना सोडून गेला तेव्हां अर्ध्याहून अधिक गांव त्याच्या मयतीसाठीं गोळा झाला होता.

हळूहळू अनेक वर्षें निघून गेलीं. या अवधींत मौलवीसाहेबांची पत्नीहि आपल्या लाडक्या मुलाला भेटण्यासाठीं देवाघरीं निघून गेली आणि करीमच्या स्मारकाजवळच मौलानासाहेबांनीं भरल्या अंतःकरणानें फातिमा बेगमचेंहि एक लहानसें स्मारक उभें केलें. जखमेवरच जखम झाली. परंतु मौलवीसाहेबांची शाळा पूर्वींप्रमाणेंच व्यवस्थितपणें चालत राहिली. दुःखामुळें माणसें एकमेकांच्या जवळ येतात. मौलवीसाहेबांवरील विपत्तीमुळें गांवकऱ्यांना ते फारच जवळचे वाटूं लागले.

आणखी कांहीं वर्षें निघून गेलीं आणि मौलवीसाहेबांच्या डोकीचे केंस व दाढीमिशा कापसासारख्या पांढऱ्या शुभ्र होऊन गेल्या.

एकाएकीं देशांत जातीयतेची आग भडकली. चोहोंकडे दंगे-धोपे आणि लूटमार यांना ऊत आला. सर्व देशभर आणि विशेषतः उत्तर भारतांत भीतीचें वातावरण पसरलें. कालपर्यंत जे मित्र होते ते आतां दुश्मन बनले आणि एकमेकांचा जीव घेण्यास तयार झाले. जिकडे पाहावें तिकडे भीषणता नंगा नाच करीत असलेली दिसूं लागली. शहरांतील आगीच्या ज्वाळा खेड्यापाड्यांपर्यंत जाऊन पोंचल्या. आपल्या गांवांतील वातावरणहि बदलत चालल्याचें मौलवीसाहेबांना दिसून आलें. परंतु त्याची त्यांना तिळमात्रहि भीति वाटली नाहीं. ते पूर्वींइतक्याच प्रेमानें व आपलेपणानें

---

दिल्लीच्या 'सस्ता-साहित्य-मंडल' या सुप्रसिद्ध प्रकाशन-संस्थेमार्फत प्रसिद्ध होणाऱ्या 'जीवन-साहित्य' या गांधीवादी मासिकाचे संपादक श्री. यशपाल जैन यांनीं फारच थोड्या अवधींत आधुनिक हिन्दी कथालेखकांमध्यें मानाचें स्थान पटकाविलें आहे. 'मैं मरूँगा नहीं' या नांवाचा त्यांचा एक कथासंग्रह नुकताच प्रसिद्ध झाला आहे. त्यांतील ही कथा त्यांच्या परवानगीनें येथें अनुवादून सादर केली आहे—अनुवादक.








मुलांना शिकवीत होते आणि गांवकऱ्यांशींहि पूर्वीप्रमाणेंच मोकळेपणानें वागत होते.

एके दिवशीं रात्रीं मौलवीसाहेब जेवणखाण आटोपून खाटेवर बसल्या बसल्या हुक्का पीत होते. इतक्यांत गांवच्या पाटलाचा मुलगा देवीप्रसाद तेथें आला आणि त्यांना सलाम करून उभा राहिला. मौलवीसाहेबांनीं नेहमींच्या पद्धतीप्रमाणें त्याला आशीर्वाद देऊन निरागसपणें विचारलें, " काय आहे, बेटा देवीप्रसाद ? "

देवीप्रसादच्या तोंडून एकहि शब्द बाहेर पडला नाहीं. " सांग ना बाळ, काय भानगड आहे ? " मौलवीसाहेबांनीं पुन्हां विचारलें.

देवीप्रसादला आपल्या भावना अनावर झाल्या व तो मुसमुसून रडूं लागला. मौलवीसाहेब आश्चर्यचकित होऊन त्याच्याकडे पाहातच राहिले. हुक्का बाजूला सारून त्यांनीं देवीप्रसादला जवळ घेतलें आणि त्याच्या पाठीवरून हात फिरवीत विचारलें, "असं रडण्यासारखं काय झालं, बाळ ? बोल ना ! "

बराच वेळपर्यंत देवीप्रसाद कांहीं बोलूं शकला नाहीं. थोड्या वेळानें त्यानें स्वतःला सांवरलें व तो म्हणाला, " मौलवीसाहेब, तुम्ही येथून तावडतोब निघून जा. "

" निघून जाऊं ? मी ? कां रे बाबा ? " मौलवीसाहेबांनीं अगदीं शांत स्वरांत त्याला विचारलें.

" मी तुमच्या पायां पडतों, मौलवीसाहेब. तुम्ही आजच्या आज येथून निघून जा. येथील चिन्हें कांहीं मला ठीक दिसत नाहींत. कुणाचा कुणावर विश्वास नाहीं. मी तुम्हांला जास्त काय सांगूं ?...मला सांगायला लाज वाटते. हरी, रामू अन् गणेश यांनीं तुमच्याविरुद्ध मोठें कारस्थान रचलें आहे. " इतकें बोलून देवीप्रसाद गप्प राहिला.

" कारस्थान ? तें कसलें ? " मौलवीसाहेबांनीं विचारलें.

" मौलवीसाहेब, पुढें कांहीं बोलायला माझी जीभच धजावत नाहीं....ते म्हणत होते...एखादे दिवशीं रात्रीं मौलवीसाहेबांच्या घरावर हल्ला करून त्यांना ठार......"

देवीप्रसाद आपलें वाक्य पुरें करूं शकला नाहीं. त्याची जरूरीहि नव्हती. मौलानासाहेबांच्या लक्षांत सर्व परिस्थिति तावडतोब आली. परंतु ते मुळींच विचलित झाले नाहींत. उलट, हंसत हंसत ते देवीप्रसादला म्हणाले, " बाळ, यांत एवढं काळजी करण्यासारखं काय आहे ? तुम्हां लोकांना जर माझी जरूर नाहीं, मी जर तुम्हांला नको आहे, तर मलाच माझी काळजी करण्याचें काय कारण ? अन् शिवाय तुम्हां सर्वांच्या आनंदांतच माझाहि आनंद आहे. हरीला म्हणावं त्यासाठीं रात्र तरी कशाला पाहिजे ? मी दिवसां देखील कांहीं प्रतिकार करणार नाहीं. त्यांना भिण्याची कांहीं जरूर नाहीं. जा बाळ, तूं घरीं जाऊन निश्चिंतपणें झोंप. तुझ्या मौलवीसाहेबाला नाहीं तरी आज ना उद्यां अल्लाच्या घरीं......"

मौलवीसाहेब आपलें वाक्य पुरें न करतांच शून्यामध्यें दृष्टि लावून बसले. त्यांना आपल्या जीवन-मरणाची जणूं फिकीरच नव्हती. कदाचित् त्यांना आपल्या मृत पुत्राची व पत्नीची आठवण झाली असेल. किंवा कदाचित् गांवच्या लोकांसंबंधीं ते विचार करीत असतील. देवीप्रसादला मात्र तें मौन असह्य झालें आणि तो म्हणाला, " मौलवीसाहेब, मी तुमच्या पायां पडतों, तुम्ही इथें राहूं नका. आम्ही चार-सहाजण तुमच्याबरोबर तुम्हांला पोंचवावयास येतों म्हणजे रस्त्यांत कोणी तुम्हांला त्रास देणार नाहीं. शिवाय बरोबर थोडेसें सामानहि घ्यावें लागेल. तुमचा जीव फार मोलाचा आहे, मौलवीसाहेब ! अन् जिथें तुम्ही आपली सारी उमर प्रेमानें नि आपलेपणानें घालविली त्याच गांवांत तुमच्या जीवाला अपाय होणें ही गोष्ट आम्हांला शोभत नाहीं. "

" यांत शोभण्या न शोभण्याचा काय प्रश्न आहे, बाळ ? " मौलवीसाहेब गंभीरपणें म्हणाले, " काळाबरोबर बऱ्यावाईटाची व्याख्याहि बदलत असते. जें आज चांगलें समजलें जातें तेंच उद्यांहि चांगलें समजलें जाईल असें थोडेंच आहे ? आपल्या जरूरीप्रमाणें माणूस बरें-वाईट ठरवीत असतो. मी तुलाच विचारतों, बेटा ! जिथें विश्वास नाहीं, प्रेम नाहीं, तिथें जिवंत राहण्यांत तरी काय अर्थ ? बाळ, मी प्रेमाचा भुकेला आहे. तें प्रेमच मला

जिवंत ठेवतें. तुम्हां लोकांच्या प्रेमाच्या बळावरच मी करीमला व फातिमाला विसरण्याचा प्रयत्न करीत होतों. तें तुमचें प्रेमच नाहींसें झाल्यानंतर इथें राहण्याचा अट्टाहास मीं कां करावा? त्या दोघांजवळ कां जाऊं नये?" इतकें बोलतां बोलतां मौलवीसाहेबांचे डोळे भरून आले.

देवीप्रसादनें मौलवीसाहेबांची खूप मनधरणी केली, खूप आग्रह केला, परंतु मौलवीसाहेब गांव सोडण्यास तयार झाले नाहींत. त्यांनीं त्याला स्पष्ट सांगून टाकलें कीं, "बेटा, जे भ्याड असतात तेच संकटाला भिऊन पळून जातात. ज्याचें जीवन प्रेमावरच आधारलेलें असेल त्याला भिण्याची जरुरी काय?"

देवीप्रसाद निघून गेला आणि मौलवीसाहेब खाटेवर पडून राहिले! त्यांच्या मनांत भीतीचा लवलेशहि नव्हता. परंतु करीम व फातिमा यांच्या आठवणीनें ते थोडेसे अस्वस्थ झाले. ते मनाशींच विचार करूं लागले : "हें सर्व आहे तरी काय? माणसाचें प्रेम म्हणजे क्षणार्धात फुटणारा बुडबुडा आहे कीं काय! त्या प्रेमाची मुळें जरासें वारें लागतांच उन्मळून पडणाऱ्या रोपट्याच्या मुळां-सारखीं कमजोर असतात कीं काय? हा द्वेष आम्हांला कुठें घेऊन जाणार न कळे! हे दंगे, या मारामाऱ्या, हें शत्रुत्व--यांचा शेवटीं परिणाम तरी काय होणार? सर्वनाश! त्याशिवाय दुसरें तर कांहींच दिसत नाहीं. या अल्ला!"

मौलवीसाहेबांनीं एक उसासा सोडला. एका क्षणामध्यें त्या गांवांतील आपलें सारें आयुष्य त्यांना आठवलें. ते गतायुष्यासंबंधीं विचार करीत पडून राहिले. पहांटेच्या सुमारास आपला डोळा केव्हां लागला हें त्यांना समजलेंहि नाहीं.

दुसरा दिवस शांततेंत गेला. मौलवीसाहेबांची शाळा नेहमींप्रमाणें भरली आणि सायंकाळीं मुलें आपापल्या घरीं गेलीं.

रात्रीच्या वेळीं मौलवीसाहेब बराच वेळपर्यंत हजरत मुहम्मद पैगंबर यांचें चरित्र वाचीत बसले. त्यांत असा एक प्रसंग होता कीं, मुहम्मदसाहेब एकटेच एका झाडाखालीं झोंपले आहेत. तें निर्जन स्थान आहे. त्यांच्याशीं वैर असणारा एक इसम तेथें येतो आणि ते एकटेच आहेत असें पाहून खूष होतो. त्यांना मारण्यासाठीं तो आपल्या म्यानांतून तरवार काढतो व वार करण्यासाठीं ती वर उगारतो. परंतु......हें काय? त्या इसमाचा हात तसाच निश्चल राहतो! मुहम्मदसाहेब निश्चिंतपणें झोंपले आहेत, त्यांच्या चेहऱ्यावर बालकाचें निष्पाप हास्य खेळत आहे. त्या इसमाचा हात वरच्यावर थोपवून धरणारी ती अदृश्य शक्ति कोणती?

मौलवीसाहेबांचे डोळे भरून आले. तो प्रेमाचा प्रभाव होता. माणसाचें अंतःकरण शुद्ध असेल तर सगळें जग शुद्ध, प्रेमळ आहे. मग कोणाला कोणाचीहि भीति वाटण्याचें काय कारण? खरेंच, माणसाचा शत्रु बाहेर नसून त्याच्या अंतःकरणांतच दडलेला असतो.

खूप रात्र झाली होती. परंतु मौलवीसाहेबांना झोंप आली नाहीं. मुहम्मदसाहेबांच्या जीवनांतील त्या प्रसंगानें ते भारावून गेले होते. त्यांनीं दिवा मालविला आणि खाटेवर पडल्यापडल्या विचार करण्यांत ते गढून गेले.

इतक्यांत कोणीं तरी दारावर हळूच थाप मारली. मौलवीसाहेब जागेच होते. परंतु काय होतें तें पाहावें म्हणून ते तसेंच पडून राहिले. दाराला कडी लाव-लेली नव्हतीच. यामुळें उठून कडी काढण्याचा प्रश्नच नव्हता. दोन-तीन मिनिटांनंतर हलकेंच दरवाजा उघडून कोणी तरी आंत आलें. त्या व्यक्तीच्या मागोमाग आणखी दोघेजण होते. चांदण्याचा शुभ्र प्रकाश पडलेला होता. यामुळें सर्वांत पुढें हरी असून तो हलक्या पावलानें आपल्या खाटेकडेच येत आहे हें मौलवीसाहेबांनीं ओळखलें. परंतु ते कांहींहि न बोलतां स्वस्थ पडून राहिले. खाटेपासून दोन-तीन हातांवर येऊन हरी उभा राहिला. त्यानें खूण करतांच त्याच्या साथी-दारांपैकीं एकानें त्याच्या हातांत कांहीं तरी लख-लखणारी वस्तु दिली. हरी आणखी एक पाऊल पुढें सरला. आतां त्याच्या साथीदारांनाहि मौलवी-साहेबांनीं ओळखलें. ते रामू व गणेश होते. त्या तिघांनाहि मौलवीसाहेबांनीं अनेक वर्षें प्रेमानें शिकविलें होतें.

बराच वेळपर्यंत हरी तेथेंच उभा राहिला. तो पुढेंहि सरत नव्हता अथवा मागेंहि जात नव्हता. तो एखाद्या मूर्तीप्रमाणें स्तब्ध उभा होता. त्याची ती द्विधा स्थिति मौलवीसाहेबांच्यानें पाहवली नाहीं. ते अचानकपणें म्हणाले, "बाळ हरी, विचार कसला करतो आहेस? पुढें कां येत नाहींस?"

भीतीनें व शरमेनें हरीचें पाणी पाणी झालें!

मौलवीसाहेब उठून बसले आणि म्हणाले, "बेटा, येत कां नाहींस? तुला जें कांहीं करायचें असेल तें करून टाक. मी तुला अडवीन तर अल्ला मला नरकांत घाडील. अरे रामू, गणेश! तुम्ही असे लांब कां? पुढें येऊन हरीला मदत करा ना?"

हरी आणि त्याचे दोन्ही साथीदार सुन्नपणें उभे होते. धरतीनें दुभंगून आपल्याला पोटांत घ्यावें किंवा आकाश कोसळून त्याखालीं आपण नष्ट होऊन जावें अशी इच्छा त्यांच्या मनांत उत्पन्न झाली. अरेरे! काय केलें हें आपण! नव्वद वर्षे वयाच्या वृद्ध मौलवीसाहेबांना ठार मारण्याचा विचार आपल्या मनांत येण्यापूर्वीच आपण कां मेलों नाहीं असें त्यांना वाटलें. आणि आपल्या अपराधाबद्दल हा देवमाणूस कठोर शब्द बोलण्याचें तर दूरच राहो, उलट प्रेमळपणानें बोलत आहे! किती नीच, किती अधम आहोंत आपण!

मौलवीसाहेब नेहमींच्या स्निग्ध सरळ स्वरांत उद्‌गारले, "मुलांनो, तुम्हांला लहानपणीं कडेखांद्यावर खेळविल्याच्या व माझ्या करीमप्रमाणेंच मानून लिहायला वाचायला शिकविल्याच्या जुन्या आठवणी माझ्या मनांत उसळल्या आहेत. परंतु तुम्हांला अगदीं मनापासून सांगतों, तुमच्याविरुद्ध माझी कांहीं तक्रार नाहीं. माणसानें आपलें कर्तव्य बजाविलेंच पाहिजे. मीं माझें कर्तव्य केलें. तुम्ही माझे लाडके मुलगे नि विद्यार्थी आहांत. तुमच्याविषयीं माझ्या हृदयांतून नेहमीं शुभाशीर्वादच बाहेर पडतील."

दुधासारख्या पांढऱ्या शुभ्र चांदण्याच्या प्रकाशांत मौलवीसाहेबांचा चेहरा उजळून निघाला.

हरीनें आपल्या हातांतील वस्तु दूर फेंकून दिली आणि कांहींहि न बोलतां हुक्क्यावरील चिलीम उचलून ती पेटवून देण्यासाठीं तो शेकोटीजवळ जाऊन बसला. रामू व गणेशहि निमूटपणें मौलवीसाहेबांच्या खाटेजवळ जाऊन बसले. मौलवीसाहेबांनीं प्रेमानें त्या दोघांच्या पाठीवरून हात फिरवीत हरीकडे पाहिलें. तो पुनः पुनः सदऱ्याच्या बाहीनें आपले डोळे पुसत होता!

---

# नि ळ्या भो र—

निळ्याभोर आभाळांत
टक लावून बसावें

मनांतील गुपितांना
स्वैर जरा पसरावें

हवी तशी सुरेलशी
तान तिथें आकारावी

भरजरी साज घ्यावा
कल्पलता शृंगारावी

मधें आली मलमल
शुभ्र-विरळ ढगाची

हलकेच हातांनीं ती
दूर जरा सारायाची

असें जावें रंगूनीया
विस्मृतीच्या संध्याकाळीं

आणि घ्यावें सांवरून
कड होता काळी काळी!

—राजा मंगळवेढेकर








भारतीय लोकसभेपुढें येणाऱ्या 'The Estate Duty Bill'च्या निमित्तानें : श्री. ग. शं. जावडेकर

# मालमत्ताकर-कायदा : त्याचें स्वरूप व संभाव्य परिणाम

या ऑगस्ट १९५३ मध्यें सुरू होणाऱ्या भारतीय पार्लमेंटच्या अधिवेशनांत 'मालमत्ताकर-कायदा' (The Estate Duty Bill 1952) हें बिल प्रामुख्यानें विचारांत घेतलें जाणार आहे. अशा स्वरूपाचा कर हिंदुस्थानांत बसवावा असा प्रयत्न आजच कांहीं प्रथम होत नाहीं. मालमत्ता-कराची कहाणी, खरें पाहिलें असतां फार जुनी असल्याचें आढळून येतें. त्याचें मूळ जसें बरेंच जुनेंपुराणें आहे, तसेच त्याचे परिणाम फार महत्त्वाचे व दूरगामी होणारे आहेत. क्वचित् एखाद्या घटकराज्यानें अंदाजपत्रकाच्या तोंड-मिळवणीसाठीं एखादा-दुसरा कर बसवावा किंवा वाढवावा इतका सहजपणा आणि निरुपद्रवीपणा या कराच्या अंगीं नाहीं. मालमत्ता-कर हा शेवटीं कर असल्यानें कोणी त्याचें सहज स्वागत करील ही कल्पना खोटी आहे. कर लादण्याचीं कारणें कितीहि साळसूदपणाचीं दाखविलीं असलीं आणि त्या कराचा उपयोग लोककल्याणास्तवच होणार असल्याचा निर्वाळा कितीहि आग्रहानें जरी अर्थमंत्र्यांनीं दिला असला, तरी स्वेच्छेनें कोणीं कधीं कर भरल्याचें ऐकिवांत नाहीं व सरकारनेंहि कार्यभाग आटोपतांच 'तात्पुरता' म्हणून बसविलेला कर रद्द केल्याचा दाखला इतिहासांत सहजीं सांपडत नाहीं. त्यांतून मूलभूत स्वरूपाचे व समाजांतील एखाद्या वर्गास बरेच जाचणारे कर असतील तर त्या कराविरुद्ध होणारी हाकाटी विशेष तीव्र स्वरूपाची असल्यास नवल नाहीं. कसेंहि असलें तरी सदर कराची आपत्ति किंवा इष्टापत्ति आतां चुकत नाहीं. सिलेक्ट कमिटीनें सादर केलेला हा कराचा मसुदा येत्या संसदेंत चर्चिला जाणार व किंचित् फेरफार होऊन त्यावर कायद्याचा शिक्कामोर्तब होणार हें आतां जवळजवळ ठरलेलेंच आहे. तेव्हां त्या निमित्तानें या कर-कायद्याचें स्वरूप काय आहे व त्याचा महत्त्वाचा आर्थिक-सामाजिक परिणाम काय होणार आहे, हें त्यांतील कांहीं महत्त्वाच्या कलमांच्या अनुषंगानें विचारांत घ्यावें इतकाच मर्यादित असा या लेखाचा उद्देश आहे.

हा कर हिंदुस्थानांतील परिस्थितींत शक्य व व्यवहार्य कितपत आहे त्याबद्दल सूचना करण्याचें काम १९२५ सालीं नेमलेल्या 'हिंदी करचौकशी-समिति'कडे प्रथम सोंपविलें होतें. या समितीनें या प्रश्नाची सर्वांगीण चौकशी करतांना, हिंदू व मुस्लिम वारसा-कायद्यांतील अनेक गुंतागुंती जेव्हां नजरे-समोर उभ्या राहिलेल्या पाहिल्या, तेव्हां ती चौकशी शेवटास नेलीच नाहीं. सर्व अर्थमंत्र्यांची एक परिषद् १९३८ सालीं भरली असतांना पुनः एकदां या विषयास चालना देण्यांत आली. पण तेव्हांहि अनेक कारणांमुळें या कल्पनेचा पिच्छा पुरविण्यांत आला नाहीं. १९४६ सालीं सर अर्चिबॉल्ड रौलँडस् या केंद्रीय अर्थमंत्र्यानें असा कर या देशांत बसवावा म्हणून पुनश्च जोर धरला. नंतरच्या काळांत हंगामी राष्ट्रीय सरकारचे अर्थ-सचिव लियाकतअली खान यांनींहि तिकडे लक्ष पुरविलें. पण या काळाची करुण कहाणी आणि त्या वेळच्या तीव्र स्वरूपाच्या राजकीय घडामोडी व उलथापालथी या सर्वांना अद्यापहि ताजेपणानें आठवत असल्यानें या कराचा प्रश्न तेव्हां धसास कां लागला नाहीं तें विस्तारानें सांगण्याचें कारण नाहीं. रोजच्या घडणाऱ्या अपेक्षित वा अनपेक्षित घटना निस्तरण्यांतच जर दिवसाचे बारा तास कमी पडत होते तर कांहीं दूरवरचे प्रश्न कोण हातीं घेणार ? १९४८ सालीं स्वतंत्र भारताच्या पहिल्या जनताभिमुख पार्लमेंटनें शेवटीं या रेंगाळलेल्या विषयास हात घातला. बिलाचा मसुदा सिलेक्ट कमिटीच्या हवालीं केलाहि होता. पण तेवढ्यांत पार्लमेंट बरखास्त झाल्यानें बिल तसेंच राहिलें. पुढें मात्र १९५२ च्या अधिवेशनांत हें बिल चर्चिलें गेलें व सिलेक्ट कमिटीच्या सूचनांसह तें आतां ऑगस्ट १९५३ मध्यें सर्वांगीण चर्चेसाठीं अग्रस्थानीं आहे. सिलेक्ट कमिटीवर एकूण पस्तीस सभासद होते. अध्यक्ष श्री. अनन्तशयनम् अय्यंगार आणि इतर सभासदांत श्री. चिंतामण देशमुख, श्री.

न. वि. गाडगीळ, प्रा. आगरवाल, श्रीमती अनसूयाबाई काळे, शेठ तुलसीदास किलाचंद, श्री. महावीर त्यागी इत्यादि प्रमुख सभासद होते. अशा सर्व सव्यापसव्यांतून बाहेर पडलेला हा मसुदा आतां कायद्याच्या रूपांत लवकरच बाहेर येईल याविषयीं फारसा संदेह उरलेला नाहीं.

## बिलाचें स्वरूप

सिलेक्ट कमिटीनें सादर केलेलें बिल एकंदर नऊ विभागांत असून त्याचीं ८१ कलमें आहेत. दुसऱ्या विभागांत मालमत्ता-कर कोणत्या प्रकारच्या मालमत्तेवर बसविला जाईल तें स्पष्ट केलें आहे. हा कायदा अमलांत आल्यानंतर कोणाहि मृत व्यक्तीची मालमत्ता त्या व्यक्तीच्या वारसाकडे ( किंवा दुसऱ्या कोणाहि व्यक्तीकडे ) जातांना, त्या मालमत्तेवर (बाजारभावानें होणाऱ्या तिच्या किंमतीवर ) हा कर आकारला जाईल. मालमत्तेमध्यें सर्व प्रकारच्या मालमत्तेचा समावेश आहे. मुंबई, मध्यप्रदेश, ओरिसा, उत्तर प्रदेश, हैदराबाद, राजस्थान व सौराष्ट्र या घटकराज्यांत मालमत्तेमध्यें शेतजमिनीचाहि अंतर्भाव होतो. इतर राज्यांत तद्देशीय शेतीचे कायदे जे अस्तित्वांत आहेत त्यांतील विरोधामुळें हा कायदा तेथें शेतजमिनीस लागू नाहीं ( कलम ९ ). कोणत्या प्रकारची मालमत्ता एका व्यक्तीकडून दुसरीकडे गेली असें समजावयाचें याविषयीं कलमें ६ ते १६ मध्यें सविस्तर वर्णन आहे. मृत्यूपूर्वी जर कांहीं काल बक्षिसपत्रानें मालमत्ता एकाद्यास मिळाली असेल तर ती देणाऱ्याच्या मृत्यूनंतर करपात्र ठरते.

कलमें १३, १४, १५ व १६ मधील तरतुदीमुळें विमा-पॉलिसी व तदनुषंगिक इतर प्रकारचे फायदे यांना कर लागू असल्याचें स्पष्ट झालें आहे. कलम १७ ते १९ मध्यें व्यक्तीनें खासगी कंपनीस बहाल केलेल्या मालमत्तेवर कर बसविण्याचा उल्लेख आहे. खासगी मालकीच्या कंपनीस दिलेल्या मालमत्तेबद्दल कंपनीकडून व्यक्तीस मिळावयाचा मुशाहिरा किंवा तत्सदृश इतर फायदा जर व्यक्तीच्या मृत्यूपूर्वी तीन वर्षें मिळत असेल तर कंपनीस दिलेल्या मालमत्तेवर कर बसावयाचा आहे. अशा परिस्थितींत व्यक्तीच्या मृत्यूची वार्ता मृत्यूपासून पंचेचाळीस दिवसांच्या आंत कंपनीनें कर-व्यवस्थापका-( Controller ) ला दिली पाहिजे व प्रत्यक्ष कर भरण्याच्या बाबतींतहि कंपनीच विशेष जबाबदार राहील.

या कायद्याच्या कक्षेबाहेरील प्रदेशांत स्थावर वा जंगम मालमत्तेवर हा कर लागू नाहीं. इतर देशांतील हा नियम थोडा निराळा आहे. करमाफ मालमत्तेमध्यें विश्वस्त म्हणून बाळगिलेली व त्या व्यक्तीच्या मृत्यूनंतर विश्वस्त म्हणूनच इतरांकडे जाणारी मालमत्ताहि समाविष्ट आहे. थोड्याच अवधींत होणाऱ्या लागोपाठ अनेक मृत्यूंमुळें जर मालमत्ता द्रुतगतीनें एकाकडून दुसऱ्याकडे गेली तर थोड्याच काळांत भरपूर कर द्यावा लागल्यानें वारसाचें जे नुकसान होईल, तें होऊं नये म्हणून महत्त्वाची तरतूद कलम ३० मध्यें आहे. खालील कोष्टकावरून एकापासून पांच वर्षांपर्यंत दोन मृत्यू झाले तर कर म्हणून द्यावयाची रकम किती कमी द्यावयाची तें स्पष्ट होईल.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| एक वर्षांत | २ मृत्यू | झाल्यास | दुसरा | कर | ५०% कमी |
| दोन | ,, | ,, | ,, | ,, | ४०% कमी |
| तीन | ,, | ,, | ,, | ,, | ३०% कमी |
| चार | ,, | ,, | ,, | ,, | २०% कमी |
| पांच | ,, | ,, | ,, | ,, | १०% कमी |

या कलमामुळें केवळ दुर्दैवाच्या आघातामुळें ज्यांचें आधींच आर्थिक व प्रापंचिक नुकसान झालें आहे त्यांची आणखी पिळवणूक होणार नाहीं असें आश्वासन दिलें गेलें आहे. कराचा उद्देश, अनायासानें मिळणाऱ्या मालमत्तेंतील वाजवी भाग समाजास सरकारतर्फे मिळावा असा आहे. पण वरील तरतूद नसेल तर कांहीं दुर्दैवी व्यक्तींस हा कर जाचक ठरण्याचा संभव आहे. कर्त्या माणसाच्या मृत्यूमुळें हवालदिल झालेल्यांना आर्थिक घटहि सोसावी लागून, ' संकटें समुदायानें येतात ' असें म्हणण्याची पाळी येऊं नये हा येथें उद्देश आहे. पण करांत दिली जाणारी सूट मात्र न्याय्य व वाजवी आहे असें म्हणतां येणार नाहीं. या ठिकाणींहि इतर देशांतील नियमांशीं तुलना करतां हे नियम अधिक कडक असल्याचें दिसतें. चार किंवा पांच वर्षांत दोन मृत्यू झाल्यास करांत सूट

मिळावी हें ठीक. पण एकाच वर्षांत दोन मृत्यू झाल्यास दुसऱ्या खेपेस कर माफ व्हावा हें उचित होय.

चौथ्या भागांतील कलम ३४ मध्यें कराचें प्रत्यक्ष दर कसे असावेत व किमान करमाफ मालमत्ता किती असावी याचें वर्णन केलें आहे. व्यक्तीची मालमत्ता एकत्रित करून त्या मालमत्तेच्या एकूण बाजारी किंमतीवर मालमत्ता-कर बसावयाचा आहे. कराचें प्रमाण नंतर पार्लमेंटच्या कायद्यानें ठरायचें आहे. पण करपात्र मालमत्ता व करमाफ मालमत्ता यांविषयीं खालीलप्रमाणें कर-योजना होणार आहे :

( अ ) हिंदु एकत्र-कुटुंबीय मालमत्तेमध्यें समाविष्ट असलेली मालमत्ता असेल, तर त्या मालमत्तेची किंमत पन्नास हजार रुपये होईपर्यंत त्यावर कर लागू नाहीं. आणि

( ब ) याशिवाय दुसऱ्या कोणत्याहि प्रकारची मालमत्ता असेल ( म्हणजे जिचा संबंध हिंदु एकत्र-कुटुंबीय मालमत्तेशीं नाहीं व जी वैयक्तिक किंवा अन्य प्रकारची आहे ) तर त्या मालमत्तेची किंमत पंचाहत्तर हजार रुपये होईपर्यंत तीवर कर लागू नाहीं.

आतां वरील दोन्ही प्रकारची ( 'अ' व 'ब' ) मालमत्ता एकाद्या व्यक्तीची एकाच वेळीं असूं शकेल. व्यक्तीनें स्वतंत्रपणें स्वतःपुरती संपादिलेली व व्यक्तीची एकत्र कुटुंबांतील हिस्सेरशीनें ठरणारी ही मालमत्ता व्यक्तीच्या मृत्यूनंतर दुसऱ्या हातीं जातांना तीवर कर लागू होणार. त्याचें कोष्टक पुढीलप्रमाणें आहे : 'अ' आणि 'ब' या मालमत्तेची किंमत करावयाची व ती सर्व 'अ' प्रकारचीच आहे असें समजून किती कर द्यावा लागेल तें काढावयाचें. व त्या कराचा फक्त $\left(\frac{अ}{अ + ब}\right)$ एवढा भागच प्रत्यक्ष कर द्यावयाचा. त्याचप्रमाणें 'अ' आणि 'ब' ही मालमत्ता केवळ 'ब' प्रकारचीच आहे असें समजून किती कर द्यावा लागेल तें काढावयाचें व त्याचा $\left(\frac{ब}{अ + ब}\right)$ एवढा भागच प्रत्यक्ष कर म्हणून भरावयाचा. हे दोन्ही भाग एकत्र करून होईल तो एकूण कर व्यक्तीला वरील मालमत्तेवर भरावा लागेल.

कराचें प्रमाण किंवा दर या कायद्यांतच ठरविलेले नसून तें पार्लमेंटनें प्रतिवर्षीच्या अंदाजपत्रकासमवेत पास होणाऱ्या अर्थकायद्या—( Finance Bill ) —अन्वयें पास करून घ्यायचें आहे. याच कायद्यांत दर किंवा त्याची कमाल मर्यादा समाविष्ट केली असती तर त्यामुळें जनतेवर होणाऱ्या परिणामाची कल्पना आली असती. पण आज कायमचे दर न ठरवितां ते सालोसाल ठरविण्यांत मुख्य उद्देश असा आहे कीं, अंदाजपत्रकांतील जमा-खर्चाचा अंदाज घेऊन जरूर तेवढी जादा रक्कम तोंडमिळवणीसाठीं उभी करणें सोपें जावें. आजच हात बांधून घेण्यांत तथ्य नाहीं. एकदां कायम केलेले दर पुनः वाढविणें कठीणच होणार. त्यापेक्षां हा मार्ग सोपा आहे.

### मालमत्ता-कर आणि विमा-व्यवसाय

प्रस्तुत कायद्यांतील कलमें १४, १५, १६ यांमध्यें विमा-व्यवसायावर या कराचा काय परिणाम होणार तें आढळून येतें. कलम ३२ मध्यें कर लागू नसणाऱ्या मालमत्तेची यादी आहे. विम्याच्या सर्व पॉलिसींची रक्कम पांच हजारांपेक्षां अधिक झाली कीं कर लागू होणार. ही मर्यादा अतिशय कमी आहे. वास्तविक विमा-पॉलिसींचा मालमत्तेंत समावेश करतांना अंमळ जागरूकता दाखविणें जरूर होतें. निदान ही पांच हजारांची किमान मर्यादा तरी अधिक हवी होती. सिलेक्ट कमिटीच्या रिपोर्टास आपला मतभेद जोडतांना शेठ तुलसीदास किलाचंद यांनीं ही मर्यादा पंचवीस हजार असावी असें सुचविलें आहे. विमा-पॉलिसींचा समावेश करतांना कायद्याच्या लेखकांपुढें प्रगत पाश्चिमात्य राष्ट्रांतील तद्विषयक कलमें होतीं. पण ही उसनवारी करतांना देशकाल-परिस्थितीप्रमाणें त्यांत जरूर तो बदल करण्यास मात्र ते विसरले आहेत. वास्तविक मालमत्ता-कराचा विचार करतांना मालमत्तेमध्यें विमा-व्यवहारांतून निर्माण झालेली मालमत्ता समाविष्ट करून भागणार नाहीं, या देशांत तर नाहींच नाहीं. या देशांत अद्याप विमा-व्यवसाय अ-प्रगत अवस्थेंत

आहे. लोकांच्या ( विस्तृत बहुजनसमाजाच्या ) ती संवय अजून आत्मसात् झालेली नाहीं. ती जेणेंकरून वाढीस लागेल तें तें सर्व करणें जरूर आहे. आधींच अज्ञानानें कालांतरीं मिळणाऱ्या रकमेसाठीं सतत पैसे भरीत राहणें विमेदारांना पटत नाहीं. त्यांत मिळणारी रक्कम करवजा जाऊन मिळणार म्हणतांना तिची गोडी अगदींच कमी होणार. सरकारच्या दृष्टीनेंहि पाहिलें तरी विमा-व्यवसायांतूनच भांडवल उभारणीसाठीं बचत व पैसा निष्पन्न होत असल्यानें त्यावरील कर म्हणजे भांडवलावरील करच होय. बरें, पाश्चात्त्य राष्ट्रांप्रमाणें भारतांत अद्याप वृद्धापकाळ-पेन्शन, सामाजिक सुरक्षितता–योजना ( Social Security Schemes ) इत्यादि साधनें नसल्यानें या प्रकारची तरतूद करणें व्यक्तीचीच जिम्मेदारी होऊन बसते. सरकारवर फारसें अवलंबून राहणें शक्य नाहीं. या दृष्टीनें पाहिलें तरी विमा हा एकच मार्ग त्यांना उपलब्ध आहे. वास्तविक मालमत्तेचा उद्देश व विमारकमेचा उद्देश भिन्न आहे. विमा उतरतांना भावी पिढीच्या जीवन-सुलभतेचा विचार प्रमुख्यानें केला जातो; मालमत्ता करून इतरांच्या नांवानें ठेवण्यांत तो विचार मुख्यतः नसतो. पहिली गरज म्हणावी लागली तर दुसरी चैनीची बाब म्हणावी लागेल. आर्थिक व सामाजिक गरज या सदराखालीं विमा-व्यवहार येतो. त्याच कारणासाठीं उत्पन्नावरील करापासून तो मुक्त आहे व त्याच कारणासाठीं मालमत्ता कराबद्दलहि त्याचा अलग विचार करावयास हवा. पाश्चात्त्य देशांत विमा-पॉलिसींच्या हक्कदारांना ( मृत व्यक्तीच्या पत्नीस ) स्वतःची निराळी मालमत्ता असते. हिंदुस्थानांत मृत व्यक्तीनें घेतलेली पॉलिसी हाच काय तो मागें राहिलेल्यांचा आधार. हा महत्त्वाचा फरक दोन देशांतील परिस्थितींत असतांना परदेशांतील कायदा उचलून इथें लागू करणें कदापीहि योग्य होणार नाहीं. या कायद्यांतील सर्वांत अनिष्ट भाग हाच आहे. व त्याचा अनिष्ट परिणाम खालचा वर्ग व विशेषतः मध्यमवर्ग यांवर होणार आहे हेंहि स्पष्ट आहे. बिलाच्या शेवटच्या वाचनांत यांत सुधारणा व्हावी ही अपेक्षा आहे.

एकंदर मालमत्तेची किंमत करायची ती अशी : व्यक्तीच्या मृत्युसमयीं कंट्रोलरच्या मताप्रमाणें एकूण मालमत्ता खुल्या बाजारांत विकावयास काढल्यास जी काय किंमत येईल ती त्या मालमत्तेची वाजवी किंमत. एकदम सर्व मालमत्ता विकावयास काढल्यानें जर किंमतीवर कांहीं परिणाम झाला तर त्याचा विचार करायचा नाहीं. फक्त मालमत्तेवरील कांहीं घसारा असल्यास त्याचा विचार मात्र केला जाईल ( क. ३५ ). करपात्र किंमत करतांना मालमत्तेच्या एकूण किंमतीमधून मयताच्या अंत्यविधीसाठीं एक हजार रुपयांपर्यंत सूट दिली जाईल. तसेंच मयताच्या स्वतःच्या वाजवी कर्ज-बोजाबद्दलहि कांहीं सूट मिळेल. ( क. ४२ ). मालमत्ता-कराचें प्रमाण या कायद्यांतच दिलेलें नसून त्याबद्दल प्रतिवर्षीच्या संसदेच्या अधिवेशनांत स्वतंत्र कायदा होणार आहे. त्यामुळें त्याबद्दल आज कांहीं बोलतां येणार नाहीं.

### मालमत्ता-कराचें अर्थशास्त्र

वरील त्रोटक विवेचनावरून कराचें स्वरूप व रोख कसा आहे याची कल्पना येईल. या कराच्या आर्थिक स्वरूपाचा थोडा विचार करूं. लोकांच्या उत्पन्नांतील दारुण विषमता जर नष्ट करायची व त्यांत सह्य समतोलपणा राखायचा तर या करासारखा दुसरा कर नाहीं. कारण मालमत्तेवर धाऊकपणेंच तो लादला जाणार असल्यानें वारसा-हक्कानें आपाततः श्रीमंत होण्याची संधि निर्वेध राहिली नाहीं. जॉन स्टुअर्ट मिलनें पूर्वींच या स्वरूपाच्या कराविषयीं लिहितांना म्हटलें आहे कीं, खासगी मालमत्तेचें तत्त्व एकदां स्वीकारलें म्हणजे उत्पन्नांतील विषमता त्याबरोबर ओघानेंच आली. माणसाची उद्योगप्रियता, खर्चाच्या संवयी, चिकाटी, बुद्धिमत्ता किंवा मिळणारी संधि यांमुळें परस्परांच्या आर्थिक परिस्थितींत तफावत पडणारच. पण तरीहि एकाच्या श्रमानें किंवा भलाईनें दुसऱ्यास किती फायदा मिळावयाचा त्याला मर्यादा असावयास हवी व ती तशी कायद्यानेंहि घालणें श्रेयस्कर होईल. या दृष्टीनें पाहतां उत्पन्नांतील

विषमता नष्ट करून आर्थिक समता प्रस्थापिण्यासाठीं काय करतां येईल तें पाहायचें, तर अशा स्वरूपाचे कर सहज ध्यानीं येतात. मालमत्ता-कर, वारसा-कर, संपत्ति-दान-कर इत्यादि अनेक प्रकारचे मृत्यु-कर ( Death-Duties ) या सदरांत येतात. हे सर्व कर मूलतः एकाच प्रकारचे असून त्यांच्या तपशिलांतच काय तो फरक आहे. इंग्लंडमध्यें मालमत्ता-कर, वारसा-कर दोन्हीहि कर अस्तित्वांत आहेत. अमेरिकेंत केंद्र-सरकारनें मालमत्ता-कर स्वतःकडे ठेवून घटक-राज्यांना वारसा-कर बसविण्याची अनुमति दिली आहे. आस्ट्रेलियांत मध्यवर्ती सरकारनें मालमत्ता-कर बसविला असून, प्रांतसरकारें स्वतंत्र वारसा-कर बसवूं शकतात. त्या त्या देशांतील केंद्र व घटकराज्यें यांमधील कर-विभागणी, खर्चाच्या बाबी व कर वसूल करण्याच्या यंत्रणेची सुलभता इत्यादि गोष्टी ध्यानांत घेऊन या कराचें स्वरूप प्रत्येक देशांत भिन्न भिन्न ठेवलें गेलें आहे.[1]

या कराचें नैतिक अधिष्ठान पाहावयाचें झाल्यास तें व्यक्तीच्या सामाजिकत्वांत पाहावें लागेल. मयत व्यक्तीची मालमत्ता विनासायास व सुरक्षितपणें अन्य अधिकारी व्यक्तीकडे सुपूर्त होते ती मुख्यतः समाजयंत्रणेच्या विशिष्ट कार्यपद्धतीमुळें. समाजांतील कायदा, सुव्यवस्था, अनुशासन, यांच्या आधारावरच परस्पर-व्यवहार, हयातींत किंवा हयातीनंतर होत असतात. ही शांतता व सुव्यवस्था व्यक्तीस मिळते ती सरकारच्या प्रयत्नामुळें आणि म्हणूनच ती निर्माण करण्यासाठीं व्यक्तीचाहि हातभार लागणें आवश्यक आहे. खरें पाहिलें तर, सरकारकडून आपण स्वतः घेत असलेल्या विशिष्ट सामाजिक सुखसोयींबद्दल या कराच्या रूपानें व्यक्ति किंमतच देत असते.

या कराचे आर्थिक परिणाम कोणते असूं शकतील ? टीकाकारांचें म्हणणें असें कीं, हा कर मुख्यत्वेंकरून भांडवलावरच पडतो व त्यामुळें भांडवलाची उभारणी घटण्याचा संभव आहे; करामुळें व्यक्तीची बचत करण्याची प्रवृत्ति मारली जाईल व संपत्तीच्या सांठवणुकीऐवजीं ती फस्त करण्याकडेच कल राहील; एकंदरींत लोकांची कार्यप्रवणता कमी होईल व त्याचा सरतेशेवटीं देशाच्या आर्थिक परिस्थितीवर अनिष्ट परिणाम होईल.

पण या सर्व शंकांना दुसरी बाजू आहे हें थोडा विचार केला तरी सहज ध्यानीं येईल. लोकांच्या बचत-प्रवृत्तीवर परिणाम होईल व हयातींत मालमत्तेचा उपभोग घेऊन ती फस्त करण्याकडे त्यांचा

---

१. येथें इतर कांहीं देशांतील किमान करपात्र मालमत्ता व तीवरील कराचे दर पाहणें उद्बोधक होईल.

## इतर देशांतील मालमत्ता-कराचे दर

| मालमत्तेची किंमत ( रुपये ) | इंग्लंड % | अमेरिका % | स्वीडन % | जपान % |
|---|---|---|---|---|
| २५,००० | — | — | ०·७ | १५·३ |
| ५०,००० | २·० | — | ४·० | २१·९ |
| १००,००० | ३·० | — | ७·३ | २९·३ |
| २००,००० | ८·० | — | १३·८ | ३७·० |
| ३००,००० | १५·० | ०·१ | १८·२ | ४२·२ |
| ५००,००० | २४·० | ५·५ | २४·५ | ४८·८ |
| ७००,००० | ३५·० | ११·५ | २८·८ | ५२·९ |
| १०००,००० | ४०·० | १६·९ | ३२·७ | ५६·८ |
| ५००,००,००० | ८०·० | ६१·५ | ५८·८ | ७४·५ |
| १०००,००,००० | ८०·० | ६९·३ | ५९·४ | ७४·६ |

कल राहील असें म्हणावें, तर बारखास मिळणारी गडगंज संपत्ति निर्वेधपणें आतां मिळणार नसून ती करपात्र झाल्यानें, त्यास ऐदीपणा टाकून अधिक कष्ट करण्याची जरूरी भासणार आहे. पुनः एकंदर अर्थसंचयावर पूर्वीचाच परिणाम कायम राहील. भांडवलाच्या सांठवणुकीवर अनिष्ट परिणाम होईल खरा, पण तो नक्की कसा होईल ते कराचे दर कळल्याशिवाय सांगतां येणार नाहीं. मात्र एवढें खरें कीं, भांडवल-उभारणीच्या दृष्टीनें हा कर थोडा हानिकारक आहे. आज भारतामध्यें भांडवल-उभारणीचा प्रश्न अतिशय महत्त्वाचा आहे. पहिल्या पंचवार्षिक योजनेप्रमाणें खासगी भांडवलदारांकडून व खासगी उद्योगधंद्यांतूनच त्यांच्या वाढीसाठीं भांडवल उभें राहावें अशी अपेक्षा आहे. अशा वेळीं या कायद्यानें व करानें त्यांची गैरसोय होणें व त्यांचा देशाच्या भांडवल–गुंतवणुकीवर परिणाम होणें अपरिहार्य आहे. या कराचें मूळ सरकारची पैशाची भूक व सामाजिक न्याय समता आणि यांत आहे. पण समाजामध्यें कांहीं न्याय्य आणि समतोल अर्थवांटप होण्याआधीं उत्पादनवाढ व राहाणीचा विशिष्ट दर्जा निर्माण होणें जरूर आहे. आजच्या परिस्थितींत हा कर किंचित् अकालीं स्वीकारला जात आहे, ही धनपतींची तक्रार सहज कळूं शकते.

कांहींहि असलें तरी आतां हा कर येतच असल्यानें त्याचें स्वागत करणें एवढेंच देशांतील सर्व वर्गांच्या हातीं उरतें. या कायद्यांत अद्याप पुष्कळच सुधारणा होण्यास वाव आहे व त्यापैकीं कांहीं मुद्दे सिलेक्ट कमिटींतील कांहीं सभासदांनीं मतभेद-पत्रिकेंत उपस्थित केले आहेत. विद्या-व्यवसायावर या कराचा जो परिणाम होईल तो विशेषत्वानें नजरेसमोर येतो. तसेंच मालमत्तेची किंमत करतांनाहि अनेक अडचणी उत्पन्न होतील. त्या सर्वांवर दृष्टि ठेवून आज कायदा संमत करतांनाच त्यांत स्पष्टता, असंदिग्धता येईल व तो मूळ हेतूस मारक न होतां कोणासच जड वाटणार नाहीं इतका सुकर होईल, याकडे संसदेंतील प्रत्येक लोकानियुक्त सभासदानें लक्ष पुरविलें पाहिजे असें म्हणावेंसें वाटतें.

---

## साभार पोहोंच

**सुलभ हिन्दी-मराठी कोश** [ तीस हजारांवर शब्दसंख्या ] संपादक : यशवंत रामकृष्ण दाते बी. ए. एलएल्. बी. प्रकाशक : के. भि. ढवळे, मुंबई २. ( १९५३ ) पानें ८५०. मूल्य ७ रु.

**मराठी रियासत : पेशवा बाजीराव नानासाहेब** ( स. १७४९–१७६१ ) लेखक : गोविंद सखाराम सरदेसाई बी. ए., प्र. के. भि. ढवळे, मुंबई २. ( १९५३ ), पानें ४८७. किं. ७ रु.

**पेशावरचा चाकू आणि इतर कथा**— लेखक : शरच्चंद्र रोंगे. प्र. के. भि. ढवळे, मुंबई २ ( १९५३ ) पानें ९२ किं. १॥ रु.

**नाटकाच्या गोष्टी : २ : शारदा** ( गोविंद बल्लाळ देवल यांच्या 'शारदा' नाटकाची गोष्ट ) ले. पु. रा. लेले. प्र. के. भि. ढवळे, मुंबई २. ( १९५३ ) पानें. ४८ किं. ८ आणे

**'माला' कार चिपळूणकर.** लेखक : दा. न. शिखरे एम्. ए. प्र. के. भि. ढवळे, मुंबई २ ( १९५३ ). पानें ४० किं. ८ आणे.

**चन्दू : ३ :** लेखक : श्री. शं. खानवेलकर. प्र. के. भि. ढवळे, मुंबई २ ( १९५३ ). पानें ९३. किं. १ रुपया.

**उंदरांची सभा**—ले. व्यं. रा. खंडाळीकर. प्र. के. भि. ढवळे, मुंबई २ ( १९५३ ). पानें ५५. किं. ८ आणे.

**पुन्हां आमचे तात्या**—ले. भा. म. वैद्य. प्र. के भि. ढवळे, मुंबई २ ( १९५३ ). पानें. ३५ किं. ५ आणे.

---








प्रा. ना. वा. कोगेकर

# जंतुयुद्धाचें तंत्र

मुंगी, डांस, ढेकूण, चिलट, धुंगुरटें, किती क्षुल्लक जीव हे ! क्षणाक्षणाला किती तरी संख्येनें चिरडले जात असतील बिचारे कोण जाणे, त्याची कांहीं खिजगणतीच नाहीं ! परंतु क्षुल्लक आणि म्हणून उपेक्षणीय वाटणाऱ्या गोष्टी देखील कित्येक वेळां कल्पनेबाहेर उपद्रव देणाऱ्या ठरतात. हत्तीच्या एका पावलागणिक हजारोंच्या संख्येनें चिरडल्या जाणाऱ्या मुंग्यांपैकीं एकादी मुंगी जरी त्या हत्तीच्या कानांत गेली तरी त्याला सळो कीं पळो करून सोडील ! अंगांतील मस्तीमुळें चौफेर उधळलेल्या बैलाला वटणीवर आणायला एकाच डांसानें अगर चिलटानें त्याच्या नाकांत प्रवेश करायचा अवकाश कीं आलाच तो धेनुवत्सम वठणीवर म्हणून समजा. हें तर कांहींच नव्हे ! शिपायांच्या पलटणीच्या पलटणी थोडक्याच अवधींत गारद करणें, लाखों निरपराधी नागरिकांमध्यें निरनिराळ्या रोगांचा फैलाव करून हजारों आबालवृद्धांचे बळी घेणें, फळाफुलांनीं बहरून गेलेल्या वृक्षांचा नाश करणें, हातातोंडाशीं आलेलीं पिकें जाळून खाक करणें—अशली विध्वंसक शक्ति वर सांगितलेल्या क्षुद्र जीवांमध्यें पुरेपूर भरलेली आहे. ही विध्वंसक शक्ति, युद्धकालांत स्वतः मनुष्यच, या क्षुल्लक जीवांना हाताशीं धरून, आपल्या शत्रूचा नाश करण्यासाठीं उपयोगांत आणतो, हें समजल्यावर मन कसें उद्विग्न होऊन जातें ! "प्रेम आणि युद्ध या दोहोंच्या बाबतींत सर्व गुन्हे माफ असतात" अशी इंग्रजींत एक म्हण आहे. परंतु युद्धांत भाग घेणाऱ्या दोन्ही पक्षांनीं कांहीं बंधनें व नियम पाळावयाचे असतातच कीं ! पुरातन कालीं झालेल्या युद्धांत तर असे नियम व वचनें युद्ध चालू असतांना फारच कांटेकोरपणें पाळलीं जात असल्याचें आपण वाचतों. आधुनिक कालांतील युद्धांत देखील, युद्धासाठीं विषारी वायू वापरावयाचे नाहींत, रोगजंतूंचा उपयोग करावयाचा नाहीं, अशा प्रकारचे नियम, राष्ट्राराष्ट्रांत झालेल्या करारान्वयें, सर्वांनीं पाळावयाचे असतात.

एकीकडे, 'जानेवारी १९५१ मध्यें, अमेरिकेनें कोरियांतील व ईशान्य चीनमधील युद्धांत रोग-जंतूंचा सर्रास उपयोग केला' असें चीन मोठ्या विश्वासानें टाहो फोडून जगाला सांगत आहे तर उलट, 'जंतुयुद्धाचा आपल्यावरील आरोप म्हणजे खोट्या प्रचाराचा एक उत्कृष्ट नमुना होय' असें अमेरिका गर्जून सांगत आहे. आंतरराष्ट्रीय कायदे-पंडितांच्या एका मंडळानें १९५२ मध्यें कोरियाला भेट देऊन जंतुयुद्धाच्या या आरोपाबद्दलची शहानिशा करण्यासाठीं एक दौरा काढून आपला अहवाल सादर केला. त्यानंतर, आंतरराष्ट्रीय शास्त्रज्ञांच्या एका मंडळानें देखील गतवर्षींच, कोरियांत एक दौरा काढून या विषयावरील आपला अहवाल नुकताच प्रसिद्ध केला. हे दोन्ही अहवाल आतां जनतेच्या माहितीसाठीं उपलब्ध असून त्यांच्या अभ्यासावरून कोरियांतील जंतुयुद्धाच्या आरोपासंबंधीं ज्याला जो निष्कर्ष काढावासा वाटेल तो काढण्यास प्रत्येकजण मोकळा आहे. नैतिक दृष्टया, चीननें अमेरिकेवर केलेल्या वरील आरोपाला फार महत्त्व असून, त्याबद्दल उलटसुलट विचार देशोदेशीकडून मांडले जात आहेत हें आपण पाहतोंच. अर्थात्, अमेरिकेवरील जंतुयुद्धाच्या या आरोपांची शहानिशा करण्याच्या प्रयत्नांत येथें न पडतां, जंतुयुद्ध म्हणजे काय, तें कसें करतात, तें लढविण्याची पद्धत कोणती, त्यांत कोणत्या आयुधांचा कसा कसा उपयोग केला जातो वगैरे गोष्टींची माहिती देण्याचें या लेखांत योजिलें आहे.

शत्रुपक्षाकडील सैनिकांत निरनिराळ्या रोगांच्या सांथींचा फैलाव करणें; तसेंच युद्धांत प्रत्यक्ष भाग न घेणाऱ्या नागरिकांमध्यें निरनिराळ्या रोगांच्या सांथी पसरविणें व त्यांना युद्धसाहित्य निर्माण










करण्यास अपात्र करणें; धान्य-खाद्यपदार्थांचे सांठे यांमध्यें रोगजंतूंचा शिरकाव करवून देऊन ते दूषित आणि म्हणून खाण्यास निरुपयोगी करणें; हाता-तोंडाशीं आलेलीं पिकें, फळें यांवर रोगजंतूंचा मारा करून तीं जाळून टाकणें; नद्या, तळीं, विहिरी इत्यादि पिण्याच्या पाण्याचे सांठे दूषित करणें— अशा गोष्टी करून शत्रुपक्षाचा पराभव करणें आणि त्या योगें त्याला शरण यावयास लावणें हा हेतु रोग-जंतूंचा उपयोग करणाऱ्या पक्षाचा असतो. मात्र, अगदीं गुपचूप बरं का! कोठें बॉम्बस्फोटाचे आवाज नाहींत, कोठें पडझड नाहीं, आगी नाहींत किंवा कसलीहि गडबड नाहीं. जंतू म्हणजे जसे कांहीं अस्तनींतले निखारेच! मात्र जंतुयुद्ध म्हणजे कांहीं स्वस्तांतलें काम नव्हे! रोगजंतूंची वाढ काळजी-पूर्वक करावी लागते. कांहीं झालें तरी तें एक दुधारी हत्यारच आहे. जरा हलगर्जीपणा व्हावयाचा अवकाश, मालकावर तें उलटलेंच म्हणून समजा. या जंतूंच्या कित्येक पिढ्यांची जोपासना व वाढ खास बांधलेल्या प्रयोगशाळांतून, तज्ज्ञ जंतु-शास्त्रज्ञांच्या देखरेखीखालीं करावी लागते. त्यासाठीं अलोट पैसा खर्च करून बराच काळ सतत परिश्रम घ्यावे लागतात. मग कोठें हे छोटे सैनिक आपला प्रताप दाखविण्यास सिद्ध होतात. ज्या ज्या प्रदेशांत हे रोगजंतू सोडावयाचे त्या त्या भागांतल्या हवा-मानांत तग धरून ते जिवंत राहिले पाहिजेत. त्यासाठीं प्रयोगशाळेंतच त्यांना निरनिराळ्या उष्णतामानांत वाढवावें लागतें. थंड प्रदेशांतील कडाक्याच्या थंडींत तग धरूं शकतील असे जंतू व कीटक प्रयोगशाळेंत निर्माण करावे लागतात. तसेंच बदलत्या उष्णतामानाची व हवामानाची त्यांना संवय व्हावी म्हणून या जंतूंना हवेच्या पेटींत कोंडून ठेवून आंतील हवेचें उष्णतामान व आर्द्रता हळूहळू कमी-जास्त करून, त्याची त्यांना संवय करवितात. असें करतांना जे जीवजंतू कणखरपणें तगून राहतात त्यांना आणखी बदलत्या हवामानांत ठेवतात. जे कीटक रोगजंतुवाहक म्हणून वापरावयाचे असतील त्यांचें संकरण (cross-breeding) कडाक्याच्या थंडींत तग धरून राहणाऱ्या कीटकांबरोबर घडवून आणतात, व अशा संकरामुळें निर्माण होणाऱ्या कीटकांचा आणखी जास्त थंडी असणाऱ्या प्रदेशांतील कीटकांबरोबर संकर घडवून आणतात. अशा बऱ्याच संकरणांनंतर, वाटेल तेवढ्या थंडींत तग धरून राहणारे रोगजंतुवाहक कीटक पैदा होतात आणि अशांचा उपयोग अतिशय थंड प्रदेशांत होणाऱ्या युद्धांत केला जातो.

वर सांगितलेल्या पद्धतीनें जंतूंची जोपासना करून बाहेर पडणाऱ्या जंतूंचा शिरकाव शत्रुपक्षाकडील सैनिकांत अगर कोणत्या भागांत कोणत्या पद्धतीनें करतां येणें शक्य आहे याचा विचार आतां करूं या.

रोगजंतूंचा शत्रुपक्षांत प्रसार करण्याच्या अनेक पद्धती आहेत. पहिली पद्धत म्हणजे जमिनीवरून तोफांच्या साहाय्यानें रोगजंतू अगर जंतुवाहक कीटक भरलेले गोळे शत्रुप्रदेशावर फेंकणें. परंतु असे गोळे किती अंतरापर्यंत फेंकतां येतील याला मर्यादा असल्यामुळें युद्ध-आघाडीच्या आजूबाजूला-च त्यांचा शिरकाव होऊं शकेल. दुसरी व जास्त सोयीस्कर आणि अधिक परिणामकारक पद्धति म्हणजे विमानांतून जंतूंचे बॉंब टाकणें ही होय. या पद्धतीचा अवलंब केला असतां शत्रुप्रदेशांत वाटेल त्या भागांत जाऊन रोगजंतूंचा फैलाव करतां येईल. धूळ व रोगजंतू यांचें मिश्रण करून तें मिश्रण एका बॉम्बमध्यें भरलें जातें. असा बॉंब विमानांतून हवेमध्यें सोडतांच तो हवेंतच उघडला जातो व वाऱ्याबरोबर रोगजंतु-मिश्रित धूळ शत्रूपक्षाकडील भागांत सर्वत्र उधळविली जाते. जंतु-बॉम्बचा आकार रासायनिक बॉम्बसारखाच असून त्याचें वजन अंदाजें २०० पौंड असूं शकतें. त्याची अंदाजें लांबी ३ फूट, रुंदी १½ फूट व बाहेरील कवचाची जाडी पाव इंच असते.

कीड लागलेल्या पिकांवर ज्याप्रमाणें औषधाचें सिंचन करतात अगर त्यावर फवारे सोडतात त्याचप्रमाणें जंतु-बॉंब टाकण्याऐवजीं विमानांतून रोगजंतुमिश्रित धुळीचे फवारे शत्रुपक्षाकडील भागांत सोडतां येतात. रोगजंतुमिश्रित धुळीनें भरलेले कागदी अगर पुठ्ठ्याचे डबे, विमानांतून पिण्याच्या पाण्याचे सांठे, तलाव यांवर टाकतात. असे डबे पाण्याचा स्पर्श होताच आपोआप उकलले










जाऊन आंतील रोगजंतूना पाण्यांत मोकळे करतात.

प्रत्यक्ष रोगजंतू सोडण्याऐवजीं, अंगावर रोगजंतू धारण करणारे लहान लहान कीटक सोडणें हाहि एक मार्ग जंतुयुद्धांत अवलंबिला जातो. असे रोगजंतू धारण करणारे कीटक बॉम्बमध्यें भरून ते बॉम्ब विमानांतून शत्रुपक्षाकडील प्रदेशांत सोडतात. अशा बॉम्बचा स्पर्श जमिनीला होतांच तो आपोआप उघडला जाऊन आंतील कीटक सर्वत्र पसरूं लागतात. हे बॉम्ब हवेंत सोडतांना विमान जमिनीपासून साधारणपणें ५०० फूट उंचीवर आणतात व त्याचा वेग तासाला जास्तींत जास्त २०० मैल इतका ठेवतात; नाहीं तर जंतू व कीटक हे जमिनीवर येऊन पोहोंचण्याच्या आंतच मरून जातील. अशा बॉम्बच्या नाकामध्यें एक खटका बसविलेला असतो. बॉम्बचा जमिनीला स्पर्श होतांच हा खटका दाबला जाऊन आंत बसविलेल्या विद्युत्–मोटारला चालना मिळते व त्यामुळें बॉम्बचीं दोन्हीं दालनें बंद करणाऱ्या कड्या आपोआप उघडल्या जाऊन तीं दालनें खुलीं होतात. अर्थात् असें होतांच आंतील कीटक बाहेर पडतात. पॅरॅशूटच्या साहाय्यानें सोडलेले कीटकवाहू बॉम्ब पॅरॅशूट छत्रीपासून जमिनीवर पोहोंचतांच अलग होतात आणि बॉम्बमधील दालनें उघडण्याचें काम व त्याला पॅरॅशूटपासून अलग करण्याचें काम हीं दोन्हीं कामें बॉम्बच्या नाकांतील खटक्याचा स्पर्श जमिनीला होतांच आपोआप घडवून आणलीं जातात. बॉम्बच्या आंत एक बॅटरी व एक विद्युत्-मोटार बसविलेली असते व त्यांच्याकडून वरील कामें बिनबोभाट केलीं जातात. वरीलसारख्या बॉम्बमध्यें जर वेगवेगळ्या जातींचे कीटक भरले असतील तर त्या बॉम्बमध्यें प्रत्येक जातीच्या कीटकासाठीं लहान लहान खोलीवजा पातळ पुठ्ठ्यांचे कप्पे करविले जातात व बॉम्ब जमिनीवर येऊन पोहोंचतांच प्रत्येक खोलीचें दार उघडण्याचें काम आंतील विद्युत्–मोटारच्या साहाय्यानें घडवून आणलें जातें. ज्याप्रमाणें रोगजंतू धारण करणारे कीटक बॉम्बमध्यें भरून, विमानांतून खालीं फेंकले जातात् त्याचप्रमाणें पातळ पत्र्यांच्या डब्यांत असे कीटक भरून ते जमिनीवर सोडले जातात. डबे जमिनीवर आदळतांच फुटतात व आंतील जंतुवाहक कीटकांना मोकळे करतात.

कीटकांप्रमाणेंच कांहीं जातींचे प्राणी देखील रोगजंतुवाहकांचें काम करण्यासाठीं उपयोगांत आणले जातात. अशा प्राण्यांमध्यें उंदीर, घुशी, ससे व तत्सम पारध करण्याजोगे लहान लहान प्राणी यांचा अंतर्भाव होतो. या सर्व प्राण्यांच्या कातड्यांवर व केसांमध्यें रोगजंतु धारण करणाऱ्या उवा, पिसवा इत्यादि भरपूर प्रमाणांत भरून ठेवलेल्या असतात. मात्र, वरील प्राणी विमानांतून पॅराशूट( छत्री )च्या साहाय्यानें जमिनीवर सोडतात. असे प्राणी एका लहानशा पेटींत भरून ती पेटी पॅराशूटला जोडतात. अशी पेटी इच्छित ठिकाणीं उतरावी• म्हणून विमान साधारणपणें १००० फूट उंचीवर आणून मग छत्रीसह ती पेटी खालीं सोडली जाते. अर्थात्, अशा वेळीं वाहणाऱ्या वाऱ्याची दिशा व वेग या सर्व गोष्टी प्रथम विचारांत घ्याव्या लागतात हें उघडच आहे.

विमानाप्रमाणेंच आगबोटींतून देखील रोगजंतुवाहक प्राणी शत्रूच्या समुद्रकिनाऱ्यावर, त्याच्या पिछाडीकडून आणून सोडतां येतात. ज्याप्रमाणें धुराचें एकादें आच्छादन आकाशांत कृत्रिमपणें निर्माण करतां येतें त्याप्रमाणें समुद्राकडून जमिनीकडे वारे वाहत असतेवेळीं, रोगजंतू मिसळलेल्या धुळीचा लोट शत्रुप्रदेशाच्या समुद्रकिनाऱ्याकडे सोडून देतात. असें करण्यासाठीं शत्रूच्या समुद्रकिनाऱ्याजवळ आपलें जहाज उभें करावें लागतें व जमिनीच्या दिशेनें वाहणाऱ्या वाऱ्याबरोबर असा धुळीचा लोट शत्रुप्रदेशांत नेण्यास सोयीचें पडतें.

आतांपर्यंत सांगितलेल्या पद्धतींखेरीज आणखी कांहीं पद्धतींचा अवलंब जंतुयुद्धांत केला जातो. रोगजंतूंचा फैलाव करण्यासाठीं शत्रुप्रदेशावर विमानांतून रोगजंतूंनीं आच्छादिलेलीं किंवा बरबटलेलीं छापील हस्तपत्रकें, पातळ झिरझिरीत कागद, पाकिटें, फाऊंटनपेन्स इत्यादि टाकणें, हाहि एक प्रकार जंतुयुद्धांत अवलंबिला जातो. तसेंच, रोगजंतूंनीं भरलेले साबण किंवा कपडे टाकणें, रोगजंतूंनीं भरलेले व म्हणून दूषित








झालेले खाद्यपदार्थ शत्रुसैनिकांमध्यें वांटणें असेहि प्रकार जंतुयुद्धांत केले जाणें शक्य आहे. जंतुयुद्धांत ज्या जंतूंचा उपयोग केला जातो ते म्हणजे टायफस्, टायफॉईड, कॉलरा, आमांश, प्लेग, देवी, मलेरिया, पीतज्वर हे होत. अशा जंतूंना वाहून नेण्यासाठीं, गोचीड, पिसवा, माशा व डांस या कीटकांचा उपयोग मुख्यत्वेंकरून केला जातो.

जंतुयुद्धांत स्वतःचा बचाव करावयाचा असल्यास कोणते उपाय अमलांत आणावे लागतील असा प्रश्न साहजिकच उभा राहतो. संरक्षणाचा सर्वांत उत्तम मार्ग म्हणजे युद्धकालांत आपण सदैव सुसज्ज राहणें हा होय. प्रथम म्हणजे देशांतील सर्व सैनिकांना व नागरिकांना वर सांगितलेल्या सर्व रोगांवरील प्रतिबंधक अशा लसी टोंचावयास भाग पाडणें. हें काम सोपें आहे. रोगजंतुवाहक कीटक जर टाकण्यांत आले असतील, तर ज्या डब्यांतून अगर पेट्यांतून ते टाकले असतील त्या तावडतोब जाळून टाकल्या पाहिजेत. अशा पेट्या जाळून टाकण्यापूर्वीच जर आंतील कीटक चहूंकडे पसरले असतील तर ज्या भागांत त्यांचा फैलाव झाला आहे असें वाटत असेल त्या भागांत डी. डी. टी.चे फवारे सोडणें इष्ट होईल. शत्रूनें जरी जंतुमिश्रित धुळीचा मारा केला असला तरी देखील डी. डी. टी. चा मारा त्या भागांत सर्वत्र करणें योग्य होईल. अशा प्रदेशांतील उघडेवाघडे अन्न-खाद्यपदार्थ फेंकून दिले पाहिजेत. तसेंच, अशा भागांत असलेले कपडे, कापडचोपड व इतर सर्व जिनसा उकळत्या पाण्यांत व साबणांत धुऊन घेऊन मगच पुन्हां वापरावयात. दूषित भागांतील पाणी पिण्यापूर्वीं चांगलें उकळून घ्यावें व याच भागांतून आणलेले खाद्यपदार्थ कच्चे न खातां चांगले शिजवून मगच पाहिजे तर खावेत. जंतुदूषित भागांत काम करणाऱ्या स्वयंसेवकांनीं, शिपायांनीं, कामगारांनीं आपल्या तोंडावर व नाकावर संरक्षक आच्छादनें घ्यावींत आणि एकदां वापरलेले कपडे बदलून, चांगलें स्नान करावें. रोगजंतूंचा संपर्क झालेला केरकचरा तावडतोब जाळून टाकणें इष्ट होईल. उन्हाळ्यांत रोगजंतुवाहक कीटकांपासून संरक्षण मिळविण्यासाठीं घरांतील खिडक्या वगैरे लावाव्यात. तसेंच उंदीर, घुशी यांचा नायनाट करून प्लेगची भीति दूर करावी.

ढाल-तलवार, तोफा-बंदुका, रासायनिक बॉम्ब, विषारी वायू, रोगजंतू आणि शेवटीं अणुबॉम्ब-हायड्रोजन बॉम्ब अशीं क्रमाक्रमानें एकापेक्षां एक जालीम व संहारक अस्त्रें विज्ञानाच्या साहाय्यानें निर्माण करण्याचा ( व वापरण्याचा ) सपाटा मनुष्यानें चालविलेला पाहून, खरोखर नजीकच्या भविष्यांत मानवजातच समूळ नष्ट होणार कीं काय अशी भीति वाटल्यावांचून राहत नाहीं. आणि यदाकदाचित् जर का तसें झालें तर मात्र विज्ञान हा एक वर मानला जाण्याऐवजीं मनुष्यजातीला शाप म्हणूनच समजला जाईल !

---

## निःपक्ष राज्यकारभार

लोकशाहीमध्यें एक राज्यकर्ता पक्ष व दुसरा विरोधी पक्ष असलाच पाहिजे अशी परिस्थिति कायमची मानणें कदाचित् चुकीचें होईल. याचा अर्थ असा नव्हे कीं, देशांत एकपक्षीय राज्यकारभार असावा. कारण तसें असणें आत्मघातकीच होईल. माझा म्हणण्याचा अर्थ असा कीं, देशांत पक्षच असूं नयेत. निःपक्ष रीतीनेंच राज्यघटनेनुसार कारभार हांकला जावा. हल्लीं अखिलभारतीय नेतृत्वाखालीं बरेच पक्ष असून ते प्रचार करीत असतात व निवडणुकींत आपले उमेदवार उभे करीत असतात. त्यांमधूनच लोकांना निवड करावी लागते. पण ही पद्धति बरोबर नाहीं. या पद्धतीनें उत्तम कार्यकर्ता निवडून येईल याची शाश्वती नाहीं. खेडेगांवांतच लोकांनीं आपल्या पंचायती निवडाव्या. या खेड्यांतील पंचायतींनीं तालुका-पंचायती, तालुका-पंचायतींनीं जिल्हा-पंचायती व पुढें अशा रीतीनें राज्य--आणि--मध्यवर्ती सरकारें निवडलीं जावींत. —जयप्रकाश नारायण, ( सुरत येथील भाषणांतून ).








रवीन्द्रनाथ ठाकूर. अनुवादिका : प्रा. सौ. सिंधु जोशी

# ★ साहित्याची सामग्री

## रचना स्वतः रचणाऱ्यासाठीं नाहीं

केवळ स्वतःच्या आनंदासाठीं झालेलें लेखन साहित्य नव्हे. अनेकजण कवित्व करुन सांगतात कीं, पक्षी ज्याप्रमाणें स्वतः उल्हासानें गातात, त्याप्रमाणेंच लेखकाच्या रचनेचा उच्छ्वासहि आत्मगत असतो. वाचक जणूं कांहीं लपून राहूनच ऐकणार आहेत !

पक्ष्यांचीं गीतें पक्षिसमाजाला उद्देशून असतात कीं नाहीं तें नक्की सांगतां येणार नाहीं. नसतीलहि. त्याविषयीं वादविवाद करणें व्यर्थ आहे. परंतु लेखकाच्या रचनेचा प्रधान उद्देश मात्र वाचकवर्गच होय. म्हणूनच त्या अर्थानें त्याला कृत्रिम म्हणावें लागलें, तरी त्यांत दुसरें कांहीं नाहींच. आईचें दूध केवळ मुलासाठींच असतें. म्हणून तें स्वतःस्फूर्त आहे असें म्हणण्यास कांहीं हरकत दिसत नाहीं.

नीरव कवित्व आणि आत्मगत भावोच्छ्वास या दोन्ही मिथ्या गोष्टी साहित्यांत कित्येक स्थलीं प्रचलित आहेत. जें लांकूड जळत नाहीं त्याला अग्नि हें नांव देणें जसें मिथ्या आहे तसेंच जो मनुष्य आकाशाकडे पाहून आकाशाप्रमाणेंच नीरव राहिला असेल त्याला कवि म्हणणें मिथ्या आहे. प्रकटीकरण हेंच कवित्व होय. मनाच्या तळाशीं कांहीं आहे कीं नाहीं तें पाहण्यांत बाहेरच्या लोकांना कांहींच लाभ नाहीं. म्हणतात ना कीं "मिष्टान्नमितरे जनाः" ! कोठारांत किती शिल्लक आहे याचा अंदाज करण्यांत बाहेरच्या लोकांना सुख नसतें. हातांत मिष्टान्न पडणें हें त्यांना आवश्यक असतें.

साहित्यामध्यें आत्मगत भावोच्छ्वास ही सुद्धां एक अशाच प्रकारची गोष्ट आहे. रचना स्वतः रचणाऱ्यासाठीं नाहीं हें मान्य करावेंच लागेल; आणि तें मान्य करुनच पुढें विचार करावा लागेल.

आपल्या मनोभावाची स्वाभाविक प्रवृत्तिच अशी आहे कीं, ती अनेक मनांमध्यें स्वतःला अनुभवूं पाहते. निसर्गांत आपण पाहतों कीं, व्यापक होण्यासाठीं, टिकून राहण्यासाठीं, प्राण्यांमध्यें सर्वदा एक प्रकारचा प्रयत्न चाललेला असतो. जीव संततीच्या द्वारें स्वतःला जितक्या पट वाढवून जितकी जागा अधिक व्यापतील तितका त्यांचा जीवनावरील अधिकार वाढेल, त्यांचें स्वतःचें जीवन तितकें अधिक यथार्थपणें उन्नत झालेलें असेल. मनुष्धाच्या मनोभावांतहि असाच एक प्रयत्न चालूं असतो. जीवनशक्ति व मनोभाव या दोहोंमध्यें फरक एवढाच कीं, जीवनशक्तीचा अधिकार स्थलांत व कालांत असतो तर मनोभावाचा अधिकार मनांत व कालांत असतो. मनोभावाचा प्रयत्न पुष्कळ कालपर्यंत अनेक मनांवर आपला अधिकार गाजविण्यासाठीं असतो.

## पहाडावर कोरलेली अशोकची महावाणी

या एकाच आकांक्षेनें किती प्राचीन कालापासून किती इंगितें, किती भाषा, किती लिप्या, किती खोदकाम, धातूचें ओतीव काम, चामड्याचें काम, झाडांच्या सालीवर, कागदावर केलेलें काम, कुंचल्यानें, कुदळीनें, लेखणीनें केलेलें काम, तोलूनमापून केलेलें काम, किती प्रयासानें, डावीकडून उजवीकडे, उजवीकडून डावीकडे, वरुन खालीं, एका पदार्थांतून दुसऱ्या पदार्थाकडे असें होत आलें आहे ! खरोखरीं, वस्तुस्थिति अशी आहे कीं, मीं ज्याचा विचार केला, मीं ज्याचा अनुभव घेतला, तें मरणार नाहीं; तें एका मनांतून दुसऱ्या मनांत, एका कालांतून दुसऱ्या कालांत चिंतिलें जाऊन, अनुभविलें जाऊन प्रवाहित होत राहील. माझें घरदार, माझीं कागदपत्रें, माझें शरीर, माझें मन, माझ्या सुखदुःखाची सामग्री हें सगळें जाईल. पण मीं ज्याचा विचार केला,

गु. रवीन्द्रनाथ ठाकूर यांच्या 'साहित्य' नामक लेखसंग्रहांतील दुसऱ्या लेखाचा हा अनुवाद आहे.—अनुवादिका.

मीं ज्याचा अनुभव घेतला तेंच मात्र मनुष्याच्या विचाराचा आणि मनुष्याच्या बुद्धीचा आश्रय घेऊन सजीव सृष्टींत टिकून राहील.

मध्य-आशियांतील गोबीच्या वाळवंटांमध्यें जेव्हां वालुकास्तूपांतून विलुप्त मानवसमाजाच्या विस्मृत प्राचीन काळांतील जीर्ण पोथी बाहेर पडते तेव्हां तिच्या त्या अज्ञात भाषेंतील अपरिचित अक्षरांमध्यें कोणती वेदना व्यक्त होते ! कुठल्या ( गत ) कालांतील कोणा सजीव चित्ताचा प्रयत्न आज आपल्या मनांत प्रवेश लाभावा म्हणून व्याकुळपणें चालला आहे ! ज्यानें ती लिहिली तो नाहीं, ज्या लोकसमाजांत लेखन झालें तोहि नाहीं; जो मनुष्याच्या मनांतील भाव एका युगांतून दुसऱ्या युगांत येऊन आपला परिचय करून देऊं शकत नाहीं, तोच ( येथें ) दोन्ही बाहू पसरून जणूं आपल्या तोंडाकडे पाहत आहे !

जगांतील सर्वश्रेष्ठ सम्राट् अशोकाला आपल्या ज्या गोष्टी चिरकालपर्यंत श्रुतिगोचर करण्याची इच्छा होती त्या त्यानें पहाडावर खोदून ठेवल्या. त्यानें विचार केला कीं, पहाड कुठल्याहि काळीं मरणार नाहीं, अनंतकाळाच्या पथधारेवर अचल उभा राहून नव्या नव्या युगांतील पथिकांजवळ तो एकाच गोष्टीचें नित्य पाठान्तर करीत राहील. आपल्या गोष्टी सांगण्याचा भार अशोकानें पर्वतावर टाकला आहे.

पहाड त्याच्या भाषेचा भार वाहत आहे. कोठें आहे तो अशोक, कोठें आहे तें पाटलीपुत्र, कोठें गेले ते धर्मजाग्रत भारतवर्षाचे गौरवदिन ! परंतु पहाड त्या दिवसांच्या गोष्टी विस्मृत अक्षरांत, अप्रचलित भाषेंत आजहि उचारीत आहे. कित्येक दिवस त्यानें अरण्यांत रुदन केलें आहे. अशोकाची ती महावाणीहि शेंकडों वर्षें मानव-हृदयाला मुक्यासारखी फक्त इशाऱ्यानें आमंत्रण करीत आहे. त्या मार्गानें रजपूत गेले, पठाण गेले, मोंगल गेले. महाराष्ट्रीय सैन्याच्या तलवारी विजे-प्रमाणें शीघ्र वेगानें दशदिशांत प्रलयाचा फटकारा मारून गेल्या. कोणींहि त्याच्या इशाऱ्याला उत्तर दिलें नाहीं ! समुद्रपार असलेल्या त्या छोट्या द्वीपाची अशोकाला कल्पनाहि आली नव्हती ! त्याचे शिल्पी जेव्हां पाषाणफलकावर त्याचें अनु-शासन कोरीत होते तेव्हां त्या छोट्या द्वीपांतील अरण्यचारी " द्रुयिद " ( ड्रुइड ) गण आपल्या पूजेंतील भावनावेग भाषाहीन प्रस्तरस्तूपांत स्थिर करून टाकीत होते. पुढें हजारों वर्षांनंतर त्याच छोट्या द्वीपांतून एका विदेशीयानें येऊन प्राचीन काळच्या त्या मूक इंगितपाशापासून त्या अशोकाच्या भाषेची मुक्तता केली. राजचक्रवर्ती अशोकाच्या इच्छेला इतक्या शताब्दांनंतर एका विदेशीया-च्या साहाय्यानें सार्थकता लाभली. ती इच्छा म्हणजे तरी दुसरें तिसरें काय ? अशोक केवढाहि मोठा सम्राट् असो, त्यालाहि, आपल्याला काय हवें, काय नको, आपल्यासाठीं काय चांगलें आहे, काय वाईट आहे, हें रस्त्यावरील वाटसरूलासुद्धां कळावें असें वाटलें. त्याचा मनोभाव इतकीं युगें सगळ्या मानवांच्या मनाच्या आश्रयाची इच्छा करीत रस्त्याच्या कडेला उभा आहे. राजचक्र-वर्तीच्या त्या प्रबळ आकांक्षेकडे रस्त्यावरील कांहीं लोक पाहतात, कांहीं न पाहतां निघून जातात.

अर्थात्, त्यामुळें अशोकाच्या अनुशासनांना मी साहित्य म्हणतों असें नाहीं. त्यामुळें मानवहृदयाची प्रधान आकांक्षा कोणती आहे एवढें सिद्ध होतें ! आपण मूर्ती घडवितों, चित्रें रेखाटतों, कविता लिहितों, दगडाचीं मंदिरें निर्माण करतों. असा जो देशविदेशांत चिरकालापासून अविश्रांत प्रयत्न चालला आहे तो दुसरें कांहीं नसून मानवाचें हृदय मानवाच्या हृदयामध्यें अमरता मिळण्यासाठीं जी प्रार्थना करीत आहे, तिचाच तो आविष्कार आहे.

### साहित्याचें प्रधानालंबन : हृदयभाव

जें चिरकालपर्यंत मनुष्याच्या हृदयामध्यें अमर होण्याचा प्रयत्न करतें, तें सर्वसाधारणपणें आपल्या क्षणकालीन प्रयोजनांहून व प्रयत्नांहून अनेक प्रकारें भिन्न असतें. आपण वर्षाच्या गरजेसाठींच तांदूळ, जव, गहूं वगैरे पिकांची पेरणी करतों. पण जर आपल्याला अरण्याची प्रतिष्ठापना करावयाची असेल, तर वनस्पतींच्या बीजांचा संग्रह करावा लागतो. साहित्यांतहि हा चिरस्थायित्वाचा प्रयत्नच मनुष्याचा आवडता प्रयत्न आहे.








# साहित्याची सामग्री

ज्या ज्ञानाच्या गोष्टी आहेत त्यांचा प्रचार होऊन गेला कीं त्यांचा उद्देश सफल होऊन संपतो. मनुष्याच्या ज्ञानाच्या बाबतींत नवीन आविष्कारांमुळें जुना आविष्कार झांकला जातो. जें काल पंडितांला अगम्य होतें तें आज अर्वाचीन बालकालाहि नवीन नाहीं. आज जीं सगळीं तत्वें अज्ञानी माणसालाहि परिचित आहेत तीं एके काळीं पंडितांनाहि अडचणीसारखीं वाटत होतीं, हेंसुद्धां लोकांना आश्चर्यकारक वाटतें.

परंतु हृदयभावाची गोष्ट प्रचारामुळें जुनी, पुरातन होत नाहीं. ज्ञानाची बाब एकदां समजल्यावर पुन्हां ती समजून घ्यावी लागत नाहीं. अग्नि उष्ण आहे, सूर्य गोल आहे, जल तरल आहे, हें एकदां समजलें कीं झालें. दुसऱ्यांदां जर कोणी तें आपल्याला नवीन अभ्यासाप्रमाणें समजावून देऊं लागलें तर आपणाला धीर धरणें कठिण होईल. परंतु भावनेच्या गोष्टींचा वारंवार अनुभव घेऊनहि कंटाळा येत नाहीं. सूर्य पूर्व दिशेला उगवतो या गोष्टीचें आपल्या मनाला आकर्षण वाटत नाहीं, परंतु सूर्योदयाचें सौंदर्य व आनंद हीं जीवनसृष्टीपासून आजपर्यंत आपल्याला म्लान झालीशीं वाटलीं नाहींत ! एवढेंच काय, पण अनुभूति जेवढ्या अधिक प्राचीन काळापासून, जेवढ्या अधिक लोकपरंपरांतून वाहत येईल तेवढी तिची गंभीरता वाढेल, तेवढी ती आपल्याला अधिक विह्वल करूं शकेल.

म्हणून जर कोणा माणसाला आपली एखादी गोष्ट चिरकालपर्यंत मनुष्यासाठीं उज्ज्वल व नवीन भावानें अमर करून ठेवायची इच्छा असेल तर त्याला भावनेचाच आश्रय घ्यावा लागेल. म्हणून साहित्याचें प्रधान आलंबन भावनेचे विषय होत, ज्ञानाचे विषय नव्हत.

## साहित्याचें कार्य

शिवाय, ज्या ज्ञानाच्या गोष्टी आहेत त्या एका भाषेंतून दुसऱ्या भाषेंत स्थलांतर करूं शकतात. मूळ रचनेंतून अन्य रचनेंत त्या बसविल्या तर कित्येकदां त्यांची उज्ज्वलता वाढते. त्यांतील विषय घेऊन अनेक लोक अनेक भाषांत अनेक तऱ्हेनें प्रचार करूं शकतात. अशा रीतीनें त्यांचा उद्देश यथार्थपणें सफल होतो. परंतु भावनेच्या विषयांना ही गोष्ट लागू नाहीं. ती ज्या आकारांत प्रकट होते त्या आकारापासून तिला विभिन्न करतां येणार नाहीं.

ज्ञानाच्या गोष्टी प्रमाणित कराव्या लागतात. भावनेच्या गोष्टींना संचार करूं द्यावा लागतो. त्यासाठीं नाना प्रकारचीं आभास–इंगितें, नाना प्रकारच्या चतुर कला यांची जरूरी असते. त्याचें केवळ विवेचन करून चालणार नाहीं, त्याची निर्मिति करावी लागते.

ही कलाकौशल्यपूर्ण रचना भावनेच्या देहासारखी आहे. या देहामध्यें भावनेची स्थापना केल्यानेंच साहित्यकाराचा परिचय होतो. या देहाची जी प्रकृति व जें सौष्ठव असेल त्या प्रमाणांत त्यांतील आश्रित भावना मानवांमध्यें आदरणीय होते, त्या प्रमाणांतच त्या भावनेला हृदयांत व कालांत व्यापकता लाभूं शकते.

प्राण ही गोष्ट अशी आहे कीं ती फक्त देहावरच अवलंबून असते. पाण्याप्रमाणें ती एका भांड्यांतून दुसऱ्या भांड्यांत ओततां येणार नाहीं. देह आणि प्राण परस्पर एकमेकांना शोभा देऊन एकात्मभावानें विराजत असतात.

भाव, विषय, तत्व हीं सर्वसामान्य माणसांची असतात. तीं जर एकाद्या माणसानें प्रकट केलीं नाहींत तर कालक्रमें दुसरा एकादा मनुष्य तीं व्यक्त करील. पण रचना संपूर्णपणें लेखकाची स्वतःची असते. ती जशी एकाद्या माणसाची असेल तशी दुसऱ्या माणसाची असणार नाहीं. म्हणून रचनेमध्येंच लेखक यथार्थ रूपानें जिवंत राहतो, भावनेमध्यें नव्हे, विषयांतहि नव्हे.

अर्थात्, रचना म्हटली म्हणजे भावनेबरोबर भावप्रकाशनाचा उपाय किंवा साधन अशीं दोन्हींहि एकदम आलींच; परंतु विशेषेंकरून साधनच लेखकाचें स्वतःचें होय.

तलाव म्हटला कीं पाणी व त्याचा खोदलेला आधार हीं दोन्हीं एकदम येतात. पण कीर्ति कोणाची होते ? पाणी ही मनुष्याची निर्मिति नव्हे; पाणी हें चिरंतन आहे. त्याच पाण्याला विशेष भावानें सर्व-

[ पुढील मजकूर ४१ पानावर पहावा.










प्रा. ल. ह. टेंगशे

# कादंबरीकार टागोर

काव्य हा रवीन्द्रनाथ टागोर यांच्या प्रतिभेचा गाभा आहे. त्यांची मानसिक ठेवणच अशी आहे कीं, बाह्य जगापेक्षां अतर्जगांतच त्यांना अधिक आनंद वाटे. म्हणून काव्य हेंच त्यांच्या सर्वश्रेष्ठ कलाविष्काराचें खरें क्षेत्र होय. त्या मानानें कादंबरी किंवा नाटक या क्षेत्रांतील त्यांचें यश दुय्यम प्रतीचें असलें तरी त्यांतहि त्यांच्या प्रतिभेचा एक वैशिष्ट्यपूर्ण आविष्कार दिसून येतो. प्रस्तुत लेखांत त्यांच्या कादंबऱ्यांचा संक्षिप्त परिचय करून द्यावयाचें योजिलें आहे. त्यांची **'गोरा'** ही सर्वश्रेष्ठ कादंबरी होय. तिच्याबद्दलचें विवेचन शेवटीं दिलें आहे. बाकीच्या त्यांच्या कादंबऱ्या इंग्रजींत ज्या क्रमानें प्रकाशित झाल्या त्या क्रमानें घेतल्या आहेत.

**'घरेबाहेर'** या कादंबरींत कौटुंबिक सोज्वल जीवन व बाह्य जगाची दुष्ट रीत यांतील सद्दंतर वर्णिलें आहे. त्यांतील सन्दीपबाबू हें पात्र कादंबरी प्रसिद्ध झाल्यावर पुष्कळच गाजलें. सुरुवातीला एका जदुबाबू नांवाच्या गृहस्थानें 'घरेबाहेर' कादंबरींतील सन्दीपबाबू ह्या खलपुरुषाची घडण श्री अरविंद घोष यांच्यावर आधारलेली आहे, असलें अविचारी धाडसी विधान केलें होतें. त्यावर रवीन्द्रबाबूंनीं खणखणीत उत्तर देऊन त्याचें हें विधान किती धादांत खोटें आहे हें सिद्ध केलें. त्याच उत्तरांत अरविंद घोष ही हिंदुस्थानांतील अत्यंत महान् विभूति आहे, असा त्यांच्याविषयीं आपला आदरहि त्यांनीं प्रकट केला.

टागोर यांच्या प्रतिभेचा पिंड मूलतः आदर्शवादी व अध्यात्मवादी आहे. विश्वांत संवादित्व आहे, ब्रह्म आनंदस्वरूपी आहे किंवा आनंद म्हणजे ब्रह्म किंवा सत्य आहे, जगांत एकसूत्रता आहे, काव्य किंवा कला यांत अनंततत्त्वाचें प्रतिबिंब असावें, त्यांत कोणत्याहि प्रकारची न्यूनता—विरोध, विस्कळितपणा, भग्न आशा-आकांक्षा—नसावींत अशा प्रकारची त्यांची श्रद्धा असून, तसे विचार त्यांनीं आपल्या 'Creative Unity' ह्या पुस्तकांत प्रामुख्यानें मांडलेले आढळतील. या त्यांच्या ध्येयवादी व अध्यात्मवादी प्रवृत्तीमुळें त्यांच्या वाङ्मयांत वास्तववादाचें दर्शन साधारणतः आढळून येत नाहीं. परंतु त्यांतल्या त्यांत, 'घरेबाहेर' ह्या कादंबरींतील संदीपबाबू ही एकच व्यक्ति वास्तववादी वाङ्मयाचें उदाहरण म्हणून दाखवितां येईल, असें रवीन्द्रनाथांच्या वाङ्मयाचे एक समीक्षणकार डॉ. सेनगुप्त यांनीं म्हटलें आहे. ही व्यक्ति टागोरांनीं सर्व दुर्गुणांनीं काळीकुट्ट करून टाकली आहे. सन्दीपबाबू या पात्राला खिसेभरू, स्वार्थी व इतर सर्व प्रकारें अधम असा रंगविलेला आहे.

**'चोखेर बाली'** या कादंबरीचें नांव नायिकेवरून पडलें आहे. बंगाल प्रांतांत मैत्री पक्की करण्याकरितां मुली एकमेकांना वेडीवांकडीं नांवें ठेवतात. कांहीं कांहीं ठिकाणीं अशा वेळीं छोटासा अहेर देण्याचीहि पद्धत आहे. पोडामुखी (म्हणजे जळक्या तोंडाची) वगैरे नांवें ठेवण्यांत मुलींना गंमत वाटते. 'चोखेर बाली' याचा अर्थ डोळ्यांतील वालुका—म्हणजे डोळ्यांत वाळूच्या कणाप्रमाणें सलणारी. बघितल्याबरोबर चीड यावी अशीं कांहीं माणसें असतात.'चोखेर बाली'चा अर्थ असाच आहे. वेडीवांकडीं नांवें ठेवण्यांत अस्सल प्रेम व्यक्त होतें यांत शंकाच नाहीं. आई लहान मुलाला लुचा, गुलाम वगैरे लाडिकपणानें हांका मारते. पण त्यांत प्रेम ओथंबलेलें असतें हें उघड आहे.

'चोखेर बाली' ह्या कादंबरींत नेहमींचीं घरगुती भांडणें आहेत. ह्यांतील नायक एक लाडावलेलें पोर आहे. सासूबाई नवरा-बायकोच्या काव्यमय संसाराची होडी खडकावर आपटतात हा नेहमींचा अनुभव या पुस्तकांत जरा अतिरेकानें मांडला आहे. नवऱ्यानें बायकोला विचारतां कामा नये; तसा तो वागला कीं मग तो कितीहि नीतिभ्रष्ट असला तरी चालेल, अशा प्रकारचें मुलाला शिकविणारी आई टागोरांनीं या कादंबरींत वर्णिली आहे.

**'नौकाडुबी'** या कादंबरीच्या कथानकांत बरीच गुंतागुंत आहे. ही दुःखान्त कथा एका ब्रह्मघोटाळ्यावर आधारलेली आहे. हिंदुस्थानांत

# कादंबरीकार टागोर

विवाह ठरवितांना व्यक्तीच्या आवडीनिवडींना पूर्वी स्थान नसे. लग्न ठरविण्याचा मक्ता वडील माणसा-कडेच असे. लग्न झाल्यानंतरच पतिपत्नींची पहिल्यांदा दृष्टादृष्ट होत असे. हिंदुस्थानांतील ह्या चालीवर आधारलेली ही कादंबरी आहे. समुद्रांत नावेला झालेल्या अपघाताकडेच या कादंबरींतील खल-पुरुषाची कामगिरी येते. अपघातामुळें दोन नुकत्या लग्न झालेल्या जोडप्यांची अदलाबदल होते. घोटाळा उमजल्यावर स्त्री-पुरुषांना जवळ राहणें कठीण होऊं लागतें. कारण अविवाहित स्त्री-पुरुष एकत्रित राहिलीं कीं जगाचा विरोध सहन करूनच मार्ग काढावा लागतो. कादंबरींतल्या पात्रांची यामुळें अधिकच तारांबळ उडते. शेवटीं मात्र सर्व भानगडी नीटपणें मिटतात.

'**दो भगिनी**' या कादंबरीची सुरुवातच बहारीची असून कथानकाचें मुख्य सूत्र तींत ध्वनित केलें आहे. "स्त्रिया दोन जातींच्या असतात. कांहींची जात **मातेची** तर कांहींची **प्रियेची**." चूल व मूल यांना न कंटाळणाऱ्या व पतीला आपल्या कल्पनेप्रमाणें सुख देणाऱ्या जुन्या वळणाच्या स्त्रिया मातेच्या जातीच्या होत. आई ज्याप्रमाणें मुलाचा संभाळ करते त्याचप्रमाणें पतीला एक मोठें बाळ म्हणून पालन करणाऱ्या स्त्रिया मातेवजा होत. सौन्दर्य, चपलता, नटवेपणा, माधुर्य ह्यांपैकीं कोण-त्याहि गुणामुळें पतीला मोह घालणाऱ्या स्त्रिया 'प्रिया' जातीच्या होत.

या कादंबरींत अगदीं वेगळ्या स्वभावाच्या दोन भगिनी रेखाटल्या आहेत. शशांक हा नायक दोन तऱ्हेच्या स्त्रियांच्या पाशांत सांपडतो. पहिल्यानें त्याला पत्नीकडून खरी स्फूर्ति मिळते. संसाराचा गाडा सुरळीत चाललेला असतो, पण त्याचें सर्व लक्ष लवकरच शर्मिला नांवाच्या त्याच्या मेहुणीवर केन्द्रित होतें. ही 'प्रिया' जातीची म्हणजे फूलपांखरा-सारखी असते. शशांकाचा मेहुणीच्या नादानें सत्यनाश होतो. सौन्दर्य व प्रेम ह्यांच्या भुलावणीमुळें त्याचा सर्व धंदा अगदीं बसून जातो. पैसा गेल्यावर त्याला शहाणपण येतें. परत तो आपल्या पत्नीवर विसंबण्यास सुरुवात करतो. न कळत आपण दुसऱ्याच्या नाशाला कारणीभूत झालों ह्या जाणिवेनें शर्मिला इंग्लंडला जाते. ही कादंबरी वाचून बॅरीच्या 'What Every Woman Knows' ह्या विनोदी नाटकाची आठवण होते. त्या नाटकाचा विषयहि जवळ जवळ टागोरांच्या या कादंबरीच्या विषयाप्रमाणेंच आहे. प्रत्येक स्त्रीला माहीत असतें कीं, एकटा पति कांहींच करूं शकत नाहीं; पतीचें यश वा अपयश पत्नीवर अवलंबून असतें.

'**चार अध्याय**' या कादंबरींत एका उदात्त ध्येयवादी तरुणाची कहाणी आहे. जहाल आंदोलना-बद्दल बंगाल प्रांत हिंदुस्थानभर प्रसिद्ध आहे. पंडित जवाहरलाल नेहरूंनीं आपल्या 'आत्मचरित्रां'त बंगाली तरुणाबद्दल सहानुभूतीचे व कळकळीचे उद्गार काढले आहेत. असे तरुण कोणत्याहि राष्ट्राला भूषणभूत होतील ह्यांत शंका नाहीं. पण ब्रिटिश-राजवटींत हे तरुण तुरुंगांत गुन्हेगार म्हणून खितपत पडले होते. अंगीं अनेक सद्गुण असून दिशाभूल झाल्यामुळेंच या तरुणांची ही दशा झाली. देशभक्ति व राष्ट्रप्रेम यांना अतिरेकी विकृत स्वरूप प्राप्त झाल्यास सज्जन माणसें वेडीं होऊन महत्पाप व दुष्कृत्य करण्यास प्रवृत्त होतात. 'चार अध्याय' या कादंबरींत एक उदात्त तरुण कळत न कळत जहाल चळवळींत कसा खेचला जातो ही हकीगत आहे. खून, मारामाऱ्या, जाळपोळ वगैरे मार्गांनीं प्रगट होणारी विकृत देशभक्ति आपल्या प्रियेच्या पावलावर पाऊल ठेवूनच त्याच्या वांट्याला आलेली आहे. पण पुढें प्रेयसीनें कुमार्गांतुन वेळींच सावध होऊन आपलें पाऊल मागें घेतलें. तो तरुण मात्र वाहवतच गेला. साधनांची पवित्रता हें महात्मा गांधींचें राजकीय चळवळींतील महत्त्वाचें सूत्र होतें. ह्या कादंबरींत तेंच सूत्र आहे. "एक गोष्ट मला स्पष्ट दिसली. प्रचंड शक्तीबरोबर झगडतांना पाशवी शक्ति जर वापरली तर आपला आत्माच शेवटीं पशुतुल्य होईल...देशाचा आत्मा नष्ट करूनच देशाचें कल्याण होईल हें निखालस असत्य राष्ट्रवादी लोक जगभर आक्रोशून पसरवीत आहेत."

'**गोरा**' ही आधुनिक कालांतील हिंदुस्थानां-तील एक सर्वश्रेष्ठ कादंबरी मानली जाते. या

कादंबरींतील नायक रवींद्रनाथ आहेत असें म्हणणें उचित होईल. **गोरा** म्हणजे जुलमानें पछाडलेल्या हिंदमातेचा तळमळणारा आत्मा असेंहि म्हणतां येईल. परकीयांच्या राजवटींत अधिकाऱ्यांचा उन्मत्तपणा व हिंदी प्रजेचा अपमान व छळ सर्वत्र दृष्टीस पडे. या सर्व प्रकारांची चीड टागोरांनीं **गोरा** या पात्रांत ओतली आहे. गोरा साधें संभाषण करीत आहे असें वाटत नाहीं. टागोरच गोराच्या द्वारां स्वातंत्र्य मिळण्यापूर्वीं हिंदुस्थानांतील सामाजिक व राजकीय प्रश्नांवर स्वगत संभाषणें करीत आहेत असें वाटतें. ईश्वर, कला, स्त्री, ग्रामीण जीवन वगैरे विषयांवर गोरा वाटेल ती संधि साधून त्वेषानें आपलीं मतें मांडतो. कांहीं कांहीं वेळीं ज्वालामुखीच्या स्फोटासारखा गोरा याचा त्वेष भासतो. गोराचीं भावनाप्रधान मतें व रवीन्द्रनाथांचीं त्याच विषयावरील बुद्धिप्रधान भाषण-लेखद्वारा प्रगट होणारीं मतें ह्यांतील साम्य पाहण्यासारखें आहे.

रवीन्द्रनाथांच्या मतें प्रेम ही आयुष्यांतील अत्यंत उदात्त देणगी आहे. प्रेमाच्या अनुसंधानानें अनंत प्रभूचें दर्शन होऊं शकेल. त्यांचें **संन्यासी** हें नाटक याच विषयावर आहे. सर्वस्वाचा त्याग करून जगाला अंधकार किंवा शून्य मानणारा संन्यासी एक बालिका पाहतांच आपलें मत संपूर्णपणें पालटतो. त्याला जगांत तथ्य व प्रेमांत सत्य दिसूं लागतें. तो म्हणतो–" जग हेंच अनंत ब्रह्म आहे व सर्व सत्य प्रेमानें आकलन होण्यासारखें आहे. " टागोर प्रेम हा शब्द अत्यंत व्यापक व उदात्त अर्थानें वापरतात. मातृत्वाविषयीं लिहितांना ते अगदीं तल्लीन होतात. त्यांनीं म्हटलें आहे, "इंग्रजी पद्धतीप्रमाणें स्त्री ही हृदयाला चटका लावणारी म्हणून स्त्रीला जें महत्त्व दिलें जातें त्यांतच तिचा सन्मान आहे असें म्हणणें गैर होईल. स्त्रीत्वाची महती गायची असेल तर मातृत्व हेंच खरें तिचें पूजास्थान होय. "

स्त्रीच्या दोन जाती–माता व प्रिया-वर उल्लेखिल्या आहेतच. प्रियेची स्फूर्ति पूर्वीं हिंदुस्थानांत ' शक्ति ' या नांवानें ओळखली जात असे. **गोरा**मध्यें मातृत्वाचें मांगल्य अनेक वेळां गायिलें आहे.

" हिंदुस्थानच्या बालकांवर साक्षात् ईश्वरप्रेम करणारी, दुःखितांना आधार देणारी, पीडितांचें सांत्वन करणारी, दलितांचें आशास्थान असणारी ती माता ( सुचरिता ) पाहून त्याला आनंदाश्रें भरतें आलें. मातेची योग्यता कितीहि मोठी असली तरीसुद्धां ती अधमाधम माणसालाहि हातावेगळें करीत नाहीं यांतच तिचें खरें माहात्म्य आहे. मातृत्व म्हणजे त्याग, त्याग, त्याग. माता ही ईश्वराची प्रेममय देणगी आहे. "

स्त्रीजातीची तोंडपूजा व प्रत्यक्ष राजरोस अपमान पाहून टागोरांना अतिशय वाईट वाटे. एक नेहमीं घडणारा पण विचारवंतांना चटका लावणारा प्रसंग ' **गोरा** ' कादंबरींत वर्णिला आहे. विनय आनंदमयीला सांगत असतो, " कलकत्त्याहून आम्ही निघालों तोंच पाऊस पडूं लागला. जंक्शनला गाडी थांबल्यावर युरोपिअन कपडे घातलेला बंगाली गृहस्थ फक्त आपल्याच डोक्यावर छत्री धरून उभा होता. डब्यांतून बाहेर येणाऱ्या पत्नीकडे तो लांबून शांतपणें पाहत होता. बिचारीच्या हातांत एक मूल असून तें कसें तरी पदराखालीं तिनें संभाळलें होतें. प्लॅटफॉर्मवर थंडीनें काकडत ती तशीच पावसांत उभी राहिली. पतिराज निर्लज्जासारखे छत्री धरून उभे होते. पत्नी भिजून चिंब झाली तरी तिला या प्रकारांत आश्चर्यकारक असें कांहींच वाटलें नाहीं. स्टेशनवरील कोणत्याहि व्यक्तीला ह्या दृश्यांत वावगें असें कांहींच वाटलें नाहीं. मला वाटलें कीं सर्व बंगाल प्रांतांत, गरीब असो कीं श्रीमंत असो, स्त्री ही उन्हांत, पावसांत अनाथच आहे. त्याच क्षणीं मीं प्रतिज्ञा केली कीं, स्त्रिया या देवता आहेत किंवा अप्सरा आहेत वगैरे असत्यें पुन्हां बरळावयाचीं नाहींत ! "

शिक्षणक्षेत्रांतील रवीन्द्रबाबूंचें कार्य जगप्रसिद्ध आहे. शिस्तीच्या नांवाखालीं भरडून काढण्याऐवजीं खेळीमेळीनें आनंदी वातावरणांत सहजासहजीं मुलांनीं शिकावें असें त्यांचें मत होतें. मुलांचें कुतूहल जागृत करावें व योग्य वेळीं त्यांना शिक्षणाचा ' डोस ' पाजावा या विषयावर ' **गोरा** ' कादंबरींत एक सुंदर दृष्टांत दिला आहे. " मनांत विषय घोळत नसतांना तो शिकविणें म्हणजे भूक नसतांना-








च अन्न देण्यापैकीं प्रकार. त्यामुळें भूक बिघडते व अपचन होतें. ''

राजकीय किंवा सामाजिक क्षेत्रांत सुधारणा करावयाची असल्यास प्रेमाची बैठक आवश्यक आहे. इंग्रज राज्यकर्ते सुधारणा करूं शकले नाहींत, कारण त्यांना आमच्याविषयीं मनांत प्रेम नव्हतें. गोरा म्हणतो—'' आपण आपल्या आईबापांकडून कानपिचक्या सहन करूं. पण पोलीस तेंच करूं लागला तर सुधारणा लांबच राहिली, पण आपला असह्य अपमान होतो. आपण अगदीं रसातळाला गेलों कीं काय असें आपलें आपल्यालाच वाटतें. पहिल्यानें आपुलकी दाखवा आणि मग या सुधारणा करा. नाहीं तर तुमचा सदुपदेशसुद्धां आम्हांला नडेल. ''

हिंदुस्थानांत चातुर्वर्ण्य संस्थेतून निघालेल्या जातींच्या नांवांखालीं अमानुष जुलूम आपणांस सर्वत्र दृष्टीस पडत आहे. ह्या दुष्ट पण प्रचलित समाजरचनेवर 'गोरा' कादंबरींत टागोरांनीं प्रामुख्यानें हल्ला केला आहे. '' लहान मूल उचलून घरलें कीं तुम्हांला खात्री पटेल. या जगांत कोणतेंहि बालक आपली जात बरोबर घेऊन जन्माला येत नाहीं...जेवतांना मांजर जवळ आलें आणि त्यानें चार घांस खाल्ले तरी सोंवळें बिघडत नाहीं. पण कांहीं माणसासारखीं माणसं नुसतीं खोलींत शिरलीं कीं अन्न भ्रष्ट झालं आणि तें फेंकून दिलं पाहिजे ! माणसाचा माणसाकडून इतका अपमान करणारें हें जातीचें बंड मोडलेंच पाहिजे. ''

**साहित्याची सामग्री** [ पान ३७ वरून पुढें चालू ]

साधारण माणसांच्या उपभोगासाठीं दीर्घ कालपर्यंत सुरक्षित ठेवण्याचा जो उपाय तोच माणसाचा स्वतःचा असून, तोच त्याला कीर्तिलाभ करून देतो. त्याचप्रमाणें भावना मानवांची सर्वसाधारण असते. पण तिला विशेष आकारानें सर्व लोकांसाठीं विशेष आनंदाची सामग्री बनवून ठेवण्याची जी उपाय-रचना तीच लेखकाला कीर्तिलाभ करून देते.

म्हणूनच असें दिसतें कीं, भावनेला आपलीशी करून ती सर्वांची करणें हेंच साहित्य, हीच ललित कला. 'अंगार' (कार्बन) ही वस्तु पाण्यांत, स्थळांत, वाऱ्यांत, अनेक पदार्थांत सामान्य स्वरूपांत सर्वसाधारण असते झाडें-वेली ह्या कार्बनला निगूढ शक्तिबलानें विशेष आकारांत आपलेसें करून टाकतात आणि त्याच उपायानें पण दीर्घकाल-पर्यंत विशेष रूपानें सर्वांच्या उपभोग्य बनतात. त्या केवळ आहार आणि उष्णता यांच्या कामींच लागतात असें नव्हे; त्यांपासून सौंदर्य, छाया, स्वास्थ्य हीं देखील पसरतात.

म्हणूनच असें दिसतें कीं, साधारणांच्याच गोष्टी विशेष रूपानें आपल्याशा करून, त्यांना पुनः विशेष रूपानें सर्वसाधारण, सर्वसुलभ बनविणें हें साहित्याचें कार्य आहे.

हें जर मान्य झालें तर ज्ञानाच्या गोष्टी साहित्यांतून आपोआप वर्ज्य होतील. कारण इंग्रजींत ज्याला 'ट्रुथ' म्हणतात आणि बंगालींत ज्याला आपण 'सत्य' हें नांव दिलें आहे, अर्थात् जो बुद्धिगम्य विषय आहे, तो व्यक्तिविशेषाच्या आपलेपणांतून ( निजत्वापासून ) वगळणें अत्यंत जरुरीचें आहे. सत्य हें सर्वांशानें व्यक्तिनिरपेक्ष, शुभ्र, निरंजन असतें. गुरुत्वाकर्षण माझ्यासाठीं एका प्रकारचें, दुसऱ्यासाठीं दुसऱ्या प्रकारचें नसतें, त्याच्यावर विविध हृदयांच्या नवीन नवीन रंगांची छाया पडणारच नाहीं.

ज्या गोष्टी दुसऱ्याच्या हृदयामध्यें संचार करण्या-साठीं प्रतिभाशाली हृदयाजवळ सूर, रंग, इंगितें यांची याचना करतात, व ज्या त्या प्रतिभाशाली हृदयाच्या द्वारें निर्माण होईपर्यंत दुसऱ्या हृदयामध्यें स्थान प्राप्त करून घेऊं शकत नाहींत, त्याच गोष्टी साहित्याची सामग्री होत. ती सामग्री जेव्हां आकारांत, प्रकारांत, भावनेंत, भाषेंत, सुरांत, छंदांत एकरूप होईल तेव्हांच ती जिवंत राहील. ती मनुष्याची केवळ स्वतःची आहे. तो आविष्कार नव्हे, तें अनुकरण नव्हे, ती निर्मिति आहे. म्हणून ती एकदां प्रकाशित झाली कीं तिचें रूपान्तर वा अवस्थान्तर करून चालणार नाहीं. तिच्या प्रत्येक अंशावर तिची समग्रता संपूर्णपणें अवलंबून आहे. जेथें तिचा विच्छेद झालेला दिसून येतो तेथें ती साहित्याच्या विभागांतून त्याज्य ठरते.







दुष्काळनिवारणप्रयत्नांच्या समालोचनाच्या निमित्तानें कांहीं सूचना : डॉ. य. कृ. सोवनी

# महाराष्ट्रांतील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना

महाराष्ट्रांत चालू वर्षी म्हणजे १९५२-५३ च्या पीक-सालीं गेल्या तीस वर्षांत पडला नाहीं असा भीषण दुष्काळ पडला आणि महाराष्ट्राच्या आठ जिल्ह्यांतील सुमारें चार हजार खेडीं व त्यांतील चाळीस लाख लोक या दुष्काळाच्या तडाख्यांत सांपडले. तसेंच दुष्काळसदृश अशी परिस्थिति याच जिल्ह्यांतील सुमारें सहाशें गांवीं होती व त्यांतील साडेपांच लाख लोकांनाहि ह्या दुष्काळाचे परिणाम भोगावे लागले. अहमदनगर, सोलापूर, पुणें, उत्तर सातारा, दक्षिण सातारा, पूर्व खानदेश, पश्चिम खानदेश व नाशिक म्हणजे घाटावरील सर्व मराठी जिल्ह्यांना या दुष्काळाची कमी-अधिक प्रमाणांत झळ पोंचली. पैकीं सोलापूर व अहमदनगर हे संबंध जिल्हे आणि पुणें व दोन्ही सातारा जिल्ह्यांचे पूर्व भाग हे नेहमींचेच दुष्काळी प्रदेश समजले जातात. पण नेहमींचे दुष्काळी प्रदेश नसणाऱ्या दोन्ही खानदेश व नाशिक या जिल्ह्यांनाहि या वर्षी दुष्काळाचा तीव्र तडाखा बसला. महाराष्ट्राच्या विशिष्ट भौगोलिक रचनेमुळें येथें दुष्काळ ही नित्य परिचयाचीच गोष्ट होऊन बसल्यासारखें झालें आहे. सरकारी अहवालावरून १८०१ ते १९२१ या एकशेंवीस वर्षांच्या कालावधींत महाराष्ट्रांत ३४ वर्षें दुष्काळाचीं आहेत असें समजतें. म्हणजे दहा वर्षांतून तीन वेळां अगर दर तीन-चार वर्षांनीं एकदां दुष्काळ महाराष्ट्रास आपली भेट देत असतो आणि मोठ्या प्रमाणावर व विस्तृत क्षेत्रावर तो ज्या वेळीं पडतो त्या वेळीं महाराष्ट्राची तो अगदीं दुर्दशा करून सोडतो! त्या दृष्टीनें १९२२ सालानंतर चालू सालीं पडला एवढा भीषण दुष्काळ पडलेला नाहीं.

अशा दुष्काळाच्या तावडींत सांपडणाऱ्या जनतेला मदत करण्याची मुख्य जबाबदारी सरकारवर येते व चालू दुष्काळांत सरकारनें आपणावरील ही जबाबदारी बऱ्याचशा प्रमाणांत यशस्वी रीतीनें पार पाडली, असें आपणांस कबूल करावें लागेल. दुष्काळ-निवारणांतील तपशिलाबाबत कांहीं मतभेद आढळून आले अगर सरकारी उपाययोजनेंत कांहीं उणीवा असल्याचें आढळून आलें, तरी एकंदरीनें सरकारनें या संकटास यशस्वी रीतीनें तोंड दिलें हें मान्य केलेंच पाहिजे. दुष्काळग्रस्त जनतेचे कठिण दिवस आतां संपत आले असून महाराष्ट्रांत सध्यां ( बहुतेक चोहोंकडे ) झालेला समाधानकारक पाऊस पाहतां दुष्काळी भागांत नवें पीकपाणी झाल्यानंतर त्याची परिस्थिति सुधारेल अशी खात्री वाटूं लागली आहे. पाऊस पडला हें सुचिन्ह असलें तरी ताबडतोब दुष्काळ हटतो असें नाहीं, तर पावसानंतर पेरण्या होऊन पीक हातीं येईल त्याच वेळीं तो पूर्णपणें हटला असें म्हणतां येईल. पाऊस पडला व कांहीं लोक शेतकामासाठीं परतले तरी पुष्कळ लोकांना दुष्काळी कामें चालू ठेवून मदत पोंचविणें अवश्य असतें. म्हणून धिसाडघाईनें मदत-योजना बंद न करतां गरज पडेल व परिस्थिति सुधारत जाईल त्याप्रमाणें त्या कमी कमी करणें हेंच इष्ट आहे. अखेरच्या टप्प्यांत सरकारनें हा दृष्टिकोन न ठेवल्यास आतांपर्यंत विविध मदत-योजनांच्या द्वारें सरकारनें पीडित जनतेस जें साहाय्य पोंचविलें तें निष्फळ ठरण्याची भीति असते. म्हणून मदत-संकोच हा सुद्धां योजनाबद्ध होणें अवश्य असतें.

## दुष्काळ आणि निमदुष्काळ !

वारंवार दुष्काळ पडत असल्यामुळें त्या परिस्थितीस तोंड कसें द्यावयाचें, सरकारनें खर्चाची व इतर जबाबदारी किती उचलावयाची यासंबंधीं सरकारनें केलेले नियम ‘ फॅमिन रिलीफ कोड ’ मध्यें सविस्तरपणें नमूद आहेत व त्या अनुसार सरकारच्या मदत-योजना मुख्यतः चालू असतात. निरनिराळ्या दुष्काळांच्या वेळीं येणाऱ्या अनुभवावरून या नियमांत दुरुस्ती अगर फेरबदल करण्यांत आले आहेत. या कोडमधील तरतुदीप्रमाणें दुष्काळ ( फॅमिन ) व निमदुष्काळ ( स्केअरसिटी ) केव्हां जाहीर करावयाची हें ठरविण्याचे अधिकार जिल्हाधिकाऱ्यांना दिलेले आहेत व त्यांच्या शिफारसीनुसार सरकार दुष्काळ

# महाराष्ट्रांतील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना

अगर निमदुष्काळ जाहीर करतें. तसें पाहिलें तर, दुष्काळ व निमदुष्काळ समजण्यामधील अमुक निश्चित सीमारेषा आहे असें या कोडांत सांगितलेलें आढळत नाहीं. दुष्काळ जाहीर झाल्यावर करावयाच्या कित्येक गोष्टी ( मदत-योजना ) निमदुष्काळी परिस्थितींतहि सुरू करण्याची तरतूद कोडामध्यें आहे. उलट ' दुष्काळ ' जाहीर केल्यावर कांहीं जबाबदाऱ्या निश्चितपणें सरकारवर येऊन पडतात. या वर्षी महाराष्ट्रांत तीव्र दुष्काळ असतांहि सरकारनें ' दु ष्का ळ ' असा कोठेंच जाहीर केला नाहीं. सर्व ठिकाणीं ' नि म दु ष्का ळ ' जाहीर केल्याचें आढळून येत आहे. कदाचित् दुष्काळ जाहीर केल्यामुळें येणारी कायदेशीर जबाबदारी तर टळावी, पण दुष्काळी परिस्थितींत सुरू करावयाच्या विविध मदत-योजना सुरू करण्यास कोणताच प्रत्यवाय नाहीं, या धोरणानें सरकारनें ' निमदुष्काळ ' जाहीर केला असावा, असें वाटतें. कायदेशीर रीत्या जबाबदारींतून सुटण्याची पळवाट सरकारनें करून ठेवली असली तरी दुष्काळी परिस्थितीसाठीं कायद्यानें केलेल्या तरतुदी अगर मदत-योजना यांचा पुष्कळसा समाधानकारक रीतीनें उपयोग सरकारनें केला असल्यामुळें या कायद्याच्या तांत्रिक मुद्दयावर विशेष भर देण्याचें कारण नाहीं.

दुष्काळ जाहीर झाल्यावर दुष्काळी कामावरील मजुरांनीं अमुक एक प्रमाणाचें काम केलेंच पाहिजे अशी अट राहत नाहीं व त्या सर्वांना जगण्यास पुरेसा इतका किमान रोजगार दिला जातो. उलट, निमदुष्काळी परिस्थितींत, दुष्काळी कामावरील मजुरांना केलेल्या कामाच्या प्रमाणांत मोजमापाप्रमाणें ठरवून दिलेल्या दरानुसार मजुरी मिळते. अंगावर काम देऊन मोजमापाप्रमाणें मजुरी देण्याची पद्धति केव्हांहि श्रेयस्कर. पण हे मजुरीचे दर योग्य रीतीनें ठरविलेले असणें अवश्य आहे. या दुष्काळांत सरकारनें सुरवातीस देऊं केलेले दर फारच कमी असल्यामुळें दुष्काळी कामावरील मजूरांत बराच असंतोष पसरला. पण पुढें त्यांत सुधारणा करण्यांत आली. ही सुधारणा सर्वस्वीं समाधानकारक नसली तरी, त्यामुळें नेकीनें काम करणाऱ्या मजुरास रोजगार बरा पडत असल्याचें दिसून आलें. अर्थात् ज्याच्या कुटुंबांत न मिळविल्या अवलंबितांची संख्या जास्त त्यांना या रोजगारावर गुजराण करणें कठिण जात असे. पुढें, दुष्काळी कामावरील मजूर-कुटुंबांत या अवलंबितांचें प्रमाण जास्त आढळून आल्यास त्यांना डोल ( पोटगीसाठीं मोफत धान्य अगर रोकड पैसा ) देण्याची व्यवस्थाहि सरकारनें केली. अनाथ-अपंगांना नियमाप्रमाणें डोल देण्याचीहि व्यवस्था केली गेली. दुष्काळ जाहीर केला असतांना मोठ्या प्रमाणावर डोल दिला जातो. निमदुष्काळी परिस्थितींत देखील जरूर तेथें जवळ जवळ तेवढ्या मोठ्या प्रमाणांत डोल देण्यांत आला. अंमलबजावणींतील ढिलाई अगर सरकारी यंत्रणेंतील दीर्घसूत्रीपणा यांमुळें कांहीं ठिकाणीं काम मागणाऱ्यांना काम मिळालें नाहीं अशा तक्रारी झाल्या असल्या तरी एकंदरीनें सरकारी धोरण काम मागणाऱ्या सर्वांना काम मिळावें असें होतें व त्या प्रमाणांत बहुतेक ठिकाणीं दुष्काळी कामें काढण्यांत आलीं. महाराष्ट्रांतील निरनिराळ्या दुष्काळी कामांवर काम करणाऱ्या मजुरांची एकंदर संख्या पावणेतीन लाखांपर्यंत पोंचली होती. दुष्काळी कामावरील मजुरांच्या पिण्याच्या पाण्याची, राहण्याची ( निवाऱ्यासाठीं झोपड्या वगैरेंची ), स्वस्त रेशन धान्य, औषधोपचार व इतर आरोग्यविषयक उपाययोजना—यांची सोय अगदीं समाधानकारक नसली तरी एकंदरीनें बरी असल्यानें आढळून आलें. दुष्काळाचा विस्तार व एवढ्या विस्तृत क्षेत्रावर नित्यशः निर्माण होणारे नाना तऱ्हेचे प्रश्न या सर्वांस अगदीं समाधानकारकरीतीनें तोंड देणें संकटकालीं तातडतोबीनें निर्माण करण्यांत आलेल्या दुष्काळ-निवारणाच्या सरकारी यंत्रणेकडून अपेक्षिणें शक्यच नाहीं. दुष्काळी कामावर विशेषतः बांधबंदिस्तीच्या कामावर तज्ज्ञ अगर तंत्रज्ञ अधिकारी वर्गाची उणीव खूपच भासली. त्यामुळें त्या कामावर अनेक तक्रारी व गैरसोयी होत राहिल्या.

या दुष्काळांत दुष्काळी कामें काढतांना दुष्काळी परिस्थितीस कायमचा आळा बसावा अशा रीतीनें मुख्यतः काढलीं गेलीं ही गोष्ट विशेष होय. रस्ते करणें अगर खडी फोडणें हींच कामें आतापर्यंतच्या दुष्काळांत प्रामुख्यानें काढलीं जात; पण या वेळीं










तलाव, तळीं, नद्यांवर बंधारे यांसारखीं दुष्काळास कायमचा प्रतिबंध करणारीं कामें बऱ्याच मोठ्या प्रमाणांत काढलीं व त्यांतील कांहीं पुरीं झालीं व बरींचशीं पुरीं होत आलीं. तसेंच बांधबंदिस्तीचीं कामेंहि खूपच मोठ्या प्रमाणावर केलीं गेलीं आणि हीं कामें काढणें शक्य नसेल तेथेंच रस्ते-बांधणी अगर खडीचीं कामें काढण्यांत आलीं.

बीं-बियाणें, जनावरांना चारा, विहिरी यांसाठीं तगाईकर्जें मोठ्या प्रमाणावर देण्यांत आलीं. खावटी-साठींहि कांहीं तगाईकर्जें देण्याची तरतूद केली गेली पण ती अपुरीच म्हणावी लागेल. वस्तुतः बीं-बियाण्याच्या बाबतींत सरकारनें आधींपासून जागरूक राहून योग्य वेळीं त्याचा सांठा करून ठेवावयास हवा होता व पेरणीच्या वेळीं शेतकऱ्यास तें तगाई-कर्जरूपानें व विशेषतः गरीब शेतकऱ्यास मोफत पुरवावयास हवें होतें. सरकारनें या बाबतींत फार उशीरा हालचाल केली, त्यामुळें सर्व जिल्ह्यांत याबाबत पद्धतशीरपणें काम झालेलें आढळत नाहीं. त्या त्या जिल्हाधिकाऱ्यांनीं जेवढ्या प्रमाणांत दक्षता घेतली, तेवढ्या प्रमाणांत ही मदत पोंचविली गेली.

## पशुधनाची मोठी हानि

सरकारनें मोठ्या प्रमाणावर दुष्काळी कामें काढून लोकांना मजुरी दिली व रेशन-दुकानांतून स्वस्त धान्य पुरविलें, पाण्याची तीव्र टंचाई असली तरी जरूर तेथें टँकरनें खेडोंपाडीं पाणी पुरविलें, पिण्याच्या पाण्याच्या नवीन विहिरी खणणें व जुन्या अधिक खोल नेणें यांवरहि बराच पैसा खर्च करून दुष्काळी भागांतील पाण्याची टंचाई कमी करण्याचा प्रयत्न केला. एकूण या दुष्काळांत सरकारनें अन्नपाण्याविना माणसें मरूं दिलीं नाहींत हें खरें, पण जनावरांच्या बाबतींत मात्र सरकारला हा दावा देतां येत नाहीं. या दुष्काळांत मुख्यतः जनावरांचे चाऱ्याअभावीं अतोनात हाल झाले. या उपासमारी-मुळें किती तरी जनावरें मृत्युमुखीं पडलीं! या निसर्गाच्या फटक्यानें शेतीस उपयुक्त नाहींत अशा भाकड जनावरांचा शेतकऱ्याजवळ जो उगाच भरणा होता तो नाहींसा झाला अगर कमी झाला ही एक इष्टापत्तिच म्हटली पाहिजे, असें कांहींचें मत आहे; पण हा फटका निव्वळ भाकड व अनुपयुक्त जनावरांनाच बसला असें नाहीं, तर कामाचे बैल, दुभतीं जनावरें व तरुण होतकरू जनावरें यांनाहि तो बसला आहे. त्यामुळें शेतीस उपयुक्त असें पशुधन कमी झाल्यानें शेती नापेर राहण्याची भीति निर्माण झाली आहे. अर्थात् उपयुक्त जनावरांच्या मृत्यूचें प्रमाण अनुपयुक्तांपेक्षां बरेंच कमी आहे;तरी पण तें उपेक्षणीय खाचीतें नाहीं. चारा-पुरवठ्याचा एकंदर अंदाज घेऊन सरकारनें आधींपासून पद्धतशीर अशी कांहीं योजनाच न आंखल्यामुळें हे परिणाम भोगावे लागले. आरडा-ओरड झाल्यानंतर आयत्या वेळीं धांवपळ करून बाहेरून गरजेस पुरेल इतकी चाऱ्याची आयात त्वरित व वेळीं होऊं शकली नाहीं. गरीब शेतकऱ्यां-ना सरकारनें मोफत गवत व पेंड पुरविली. तसेंच इतर शेतकऱ्यांनाहि सवलतीच्या दरानें ती विकली व त्यासाठीं त्यांना तगाई-कर्जेंहि मंजूर केलीं. मुख्य दोष म्हणजे चाऱ्याच्या टंचाईची आधींपासून जाणीव ठेवून, चारा शक्य तेवढ्या मोठ्या प्रमाणांत दुष्काळी भागांत आणून सांठवावयास हवा होता, तें झालें नाहीं. तसेंच पाऊस पडल्याबरोबर लगेच मोफत चारा व पेंड देण्याचें व सवलतीच्या दरानें विकण्याचें एकदम बंद केलें. त्यामुळें जनावरांची हानि झाली. वस्तुतः पाऊस झाल्यानंतर स्थानिक चारा जनावरांना खातां येण्यासारखा वाढला आहे कीं नाहीं हें पाहूनच ही मदत बंद करणें अवश्य होतें. एकूण हा दुष्काळ माणसापेक्षां जनावरांनाच खरा भोंवला म्हणावयाचा!

## दुष्काळ-निवारण-समितीचें कार्य

दुष्काळ निवारण्याची मुख्य जबाबदारी सरकारवर येत असली तरी, अशा संकटकालीं आपद्ग्रस्तांस मदत पोंचविण्याची जबाबदारी इतर देशबांधवांवरहि येत असते. प्रत्येक दुष्काळी जिल्ह्यांत सरकारी नेतृत्वाखालीं अगर स्वतंत्र रीतीनें जनतेच्या दुष्काळ-निवारण-समित्या स्थापन झाल्या व त्यांनीं आपापल्या जिल्ह्यांत दुष्काळग्रस्तांसाठीं मदत-केंद्रें चालविलीं. दुष्काळी प्रदेशाबाहेरील महाराष्ट्रानेंहि आपद्ग्रस्तां-साठीं बरीच आर्थिक मदत, कपडे व धान्य पाठविलें. दुष्काळाचें भीषण स्वरूप लक्षांत घेऊन निरनिराळ्या राजकीय पक्षांच्या लोकांनीं एकत्र

# महाराष्ट्रांतील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना

येऊन एक महाराष्ट्र मध्यवर्ती दुष्काळ-निवारण-समिति स्थापन केली. या समितीनें महाराष्ट्रांत व महाराष्ट्राबाहेरून आपद्ग्रस्तांसाठीं पैसे, कपडे व धान्य जमा केलें व दुष्काळी भागांत ठिकठिकाणीं दुष्काळी कामांच्या केंद्रांवर आपलीं मदत-केंद्रें चालविलीं. जनावरांच्या छावण्या काढून गरीब शेतकऱ्यांचीं जनावरें सरकारकडून चारा व पेंड मिळवून मोफत संभाळलीं. १२ वर्षांखालील लहान मुलांना तसेंच अनाथ-अपंगांना एक वेळचें मोफत जेवण देणें, लहान मुलांना मोफत कांजी व दूध देणें, मोफत कपडे वांटणें, औषधी साहाय्य व रुग्णशुश्रूषा यांसारखीं तर कामें समितीनें केलींच, पण विशेष म्हणजे दुष्काळाच्या सुरुवातीपासून दुष्काळी परिस्थितीची आपल्या निरीक्षकांमार्फत बारकाईनें पाहणी करून सरकारी दुष्काळ-निवारण-योजना अगर कामें कोणत्या धोरणानें चालणें अवश्य आहे, त्यांत काय उणीवा आहेत याचीहि वेळोवेळीं सरकारला जाणीव करून दिली व त्याप्रमाणें सरकारी धोरणांत जरूर तो बदल घडवून आणण्याची खटपट केली. दुष्काळग्रस्तांना प्रत्यक्ष मदत पोंचविली त्यापेक्षां मध्यवर्ती समितीचें हें कार्य अत्यंत महत्त्वाचें आहे. तसेंच दुष्काळी कामांच्या केंद्रांवर मध्यवर्ती समितीच्या स्वयंसेवकांनीं मजुरांच्या पगाराबाबतच्या अगर अन्य तक्रारी व इतर सुखसोयी यांकडे लक्ष पुरवून त्यांना बहुमोल मदत केली. दुष्काळी जिल्ह्यांतून जिल्हानिहाय असणाऱ्या दुष्काळी समित्यांनीं मध्यवर्ती समितीच्या मार्गदर्शनानें व धोरणानें आपलें मदतकार्य चालविलें असतें (—सर्व जिल्ह्यांतून थोड्याफार प्रमाणांत त्यांचें सहकार्य होतें, पण संघटनात्मक असें नव्हतें—) तर यापेक्षां कार्य अधिक भरीव परिणामकारक असें होऊं शकलें असतें.

मुंबईस **राज्यपालांच्या नेतृत्वाखालींहि एक दुष्काळ-निवारण-समिति** स्थापन झाली व तिनें सर्वांत अधिक पैसा दुष्काळग्रस्तांसाठीं जमविला. पण हा जमविलेला पैसा दुष्काळी जिल्ह्यांत तेथील स्थानिक सरकारी समित्यांना वांटून टाकण्यापलीकडे अधिक कांहीं त्या समितीनें केलें नाहीं. मदत-कार्यांची तपशीलवार योजना देऊन त्याबरहुकूम तें घडवून आणण्याची जबाबदारी टाकून जर हा पैसा वांटला गेला असतां तर अधिक बरें झालें असतें.

## कायमच्या उपाययोजनेची गरज

येथवर महाराष्ट्रांतील या वर्षाच्या दुष्काळांत सरकारनें दुष्काळनिवारणार्थ केलेल्या प्रयत्नांचा व मदतयोजनांचा, तसेंच बिनसरकारी सार्वजनिक मदतकार्यांचा थोडा फार आढावा घेण्यांत आला. परंतु सुरुवातीस म्हटल्याप्रमाणें महाराष्ट्रांतील दुष्काळाचा हा प्रश्न नित्याचाच होऊन बसल्यामुळें दुष्काळ पडल्यावर तेवढ्यापुरत्या केल्या जाणाऱ्या तात्पुरत्या प्रयत्नांनीं त्याचें खरेखुरें व कायमचें निवारण कधींच होऊं शकणार नाहीं. आपत्ति ओढवली म्हणजे तात्पुरती ती कशी तरी टाळावयाची यानें कार्यभाग साधत नाहीं. अशा तात्पुरत्या प्रयत्नांत अपरंपार पैसा तर जातोच, पण त्याचा चिरस्थायी असा फारसा उपयोग होत नाहीं. यासाठीं महाराष्ट्रांतील दुष्काळ कायमचा हटण्याच्या दृष्टीनें योजनाबद्ध प्रयत्न सरकारकडून होणें अवश्य आहे. या गोष्टीची सरकारला व जनतेच्या पुढाऱ्यांनाहि आतां पूर्णपणें जाणीव झाली आहे. सरकारनें यासाठीं नेमलेल्या रा म मू र्ति-क मि श न नें दुष्काळी भागाची पाहणी करून आपला अहवाल सरकारला सादर केला आहे. त्याच्या शिफारसी नक्की काय आहेत हें तपशीलवार जाहीर झालें नसलें, तरी मोठ्या पाटबंधाऱ्यांच्या योजना हातीं घेणें, तसेंच मोठ्या प्रमाणावर बांधबंदिस्ती करून जमिनीची धूप थांबविणें यांवर त्यांनीं भर दिला असल्याचें कळतें. महाराष्ट्रांतील जनतेकडून वीर, खडकवासलें, गिरणा, मुळा, कुकडी या मोठ्या धरणयोजना सरकारनें त्वरित हातीं घ्याव्यात म्हणून गेलीं कित्येक वर्षें सतत मागणी होत आहे व या दुष्काळामुळें तर ती अधिकच जोरानें होऊं लागली आहे. परंतु दुर्दैवाची गोष्ट म्हणजे यांतील एकहि योजना पंचवार्षिक योजनेंत समाविष्ट करण्यांत आली नाहीं. याची जबाबदारी मध्यसरकार राज्यसरकारवर ढकलतें व राज्यसरकार, मध्यसरकारनें मदत केली तरच या मोठ्या योजनांचीं कामें सुरू करणें शक्य आहे, असें म्हणतें. यामुळें

जनतेतील असंतोष वाढेल ही गोष्ट वेगळी; पण ही चालढकल दुष्काळनिवारणाच्या सरकारी जबाबदारीच्या दृष्टीनें परिणामीं अधिक हानिकारक व आर्थिक दृष्ट्या नुकसानीची ठरणार आहे. दुष्काळ पडला म्हणजे लक्षावधि लोकांना जगविण्यासाठीं तात्पुरत्या योजनांच्या द्वारां कोट्यवधि रुपयांचा खर्च सरकार करतें. दुष्काळ कायमचा हटण्याच्या दृष्टीनें या धरणयोजनांवर तो खर्च केल्यास त्यामुळें वारंवार दुष्काळी परिस्थितींत करावा लागणारा खर्च आपोआप कमी होईल आणि कांहीं तरी कायमच्या उपाययोजना झाल्याखेरीज महाराष्ट्रांतील दुष्काळाचें संकट कायमचें कदापि टळणार नाहीं.

## भौगोलिक परिस्थितीचा विचार

या दख्खन पठाराची-मुंबई राज्यांतील देशावरील मराठी जिल्हे व कानडी जिल्हे यांची भौगोलिक रचना, हवामान, पाऊसपाणी लक्षांत घेतां महाराष्ट्रांतील दुष्काळ कायमचा हटविणें कितपत शक्य आहे असाहि प्रश्न निर्माण होणें स्वाभाविक आहे. भौगोलिक परिस्थिति बदलणें शक्य नाहीं; परंतु त्यामुळें होणारे दुष्परिणाम योजनाबद्ध कार्यक्रम आंखल्यास टळणेंच शक्य नाहीं असें नाहीं.

दख्खनच्या पठाराची भौगोलिक स्थिति लक्षांत आणली तर मुंबई राज्याचे तीन विभाग पडतात : पहिला, दुष्काळाच्या दृष्टीनें सुरक्षित विभाग. कारण यांत नियमित व भरपूर पाऊस पडतो. यामध्यें कोंकण, मावळ व दक्षिण गुजरात यांचा समावेश होतो. दुसरा विभाग मध्यम तुटीचा व क्वचित् दुष्काळ पडणारा. यामध्यें पूर्व व पश्चिम खानदेश, गुजरातमधील बहुतेक जिल्हे व देशावरील जिल्ह्यांचे ( पुणें, सातारा, नाशिक, बेळगांव व धारवाड यांचे ) पश्चिम भाग यांचा समावेश होतो. आणि तिसरा विभाग म्हणजे अहमदनगर, सोलापूर, विजापूर हे संपूर्ण जिल्हे व पुणें, सातारा, नाशिक, बेळगांव व धारवाड या जिल्ह्यांचे पूर्वेकडील भाग यांचा समावेश होतो. हा तिसरा विभाग वरचेवर अवर्षण पडणारा दुष्काळी विभाग म्हणून मानला जातो.

पहिल्या विभागांत शंभर ते दोनशें इंचांपर्यंत पाऊस पडतो. मध्यम तुटीच्या दुसऱ्या विभागांत तीस ते साठ इंचांपर्यंत पाऊस पडतो व तिसऱ्या दुष्काळी विभागांत पर्जन्यमान पंधरा ते पंचवीस इंचांपर्यंत असून, पाऊस अत्यंत अनियमित, अवेळीं व अनिश्चित पडणारा असतो. आणि हा भाग शेतीसाठीं बहुधा पावसाच्याच पाण्यावर अवलंबून असल्यामुळें अशा अपुऱ्या व अनिश्चित पावसामुळें येथें पिकें बुडण्याचे व त्यामुळें दुष्काळाचे प्रसंग वरचेवर ओढवतात.

मुंबई राज्यांतील एकंदर ३ कोटि ५९ लक्ष एकरांचें क्षेत्र शेतीखालीं आहे. यापैकीं फक्त ५ टक्के क्षेत्र बागायत शेतीचें आहे. राहिलेलें ९५ टक्के क्षेत्र पावसाच्या पाण्यावर अवलंबून आहे. या जिराईत शेतीपैकीं एकतृतीयांश विभाग ( -पहिला कोंकणपट्टीचा विभाग- ) पिकांच्या दृष्टीनें सुरक्षित असा आहे. दुसरा मध्यम पाऊसमानाचा व पिकांच्या दृष्टीनें मध्यम सुरक्षित असा भाग म्हणतां येईल. आणि तिसरा दुष्काळी व पिकांच्या दृष्टीनें अत्यंत असुरक्षित असा भाग आहे.

बागाईत शेती तेवढीच खरी सुरक्षित शेती असें म्हटलें तर मुंबई राज्यांतील ९५ टक्के शेती असुरक्षितच म्हणावी लागेल. इतर राज्यांतील शेतीशीं तुलना करण्याच्या दृष्टीनें पाहिलें तर मद्रास राज्यांत एकंदर शेतीपैकीं तीस टक्के शेती बागायत म्हणजे सुरक्षित आहे. सर्व भारतांत बागायत शेतीचें प्रमाण एकोणीस टक्के आहे. शिवाय, भारतांतील उत्तर प्रदेश, बिहार, बंगाल, मध्यप्रदेश यांमध्यें पाऊस भरपूर व वेळोवेळीं पडतो. त्यामुळें तेथील जिरायत शेतीहि बरीचशी सुरक्षित आहे.

यावरून हें दिसून येईल कीं, मुंबई राज्यांतील देशावरील अंदाजें १ कोटि २९ लक्ष एकरांचा शेतीविभाग कायमचा दुष्काळी व पावसाच्या लहरीवर अवलंबून राहतो. आणि एवढ्या क्षेत्राची शेती संरक्षित करणें कठीण आहे. मग या भागांतील लोकांचें जीवन कायमचें निसर्गाच्या लहरीवर अवलंबून ठेवावयाचें कीं काय ? मध्यम तुटीचा व क्वचित् दुष्काळाचा असा जो मधला पट्टा आहे त्यामध्यें सहसा दुष्काळ पडत नाहीं; पण या पट्ट्यांत मोडणाऱ्या पूर्व खानदेश व नाशिक या जिल्ह्यांमध्येंहि या वर्षी दुष्काळ आहे. म्हणजे








१ कोटि २५ लक्ष एकरांच्या दुष्काळी पट्टयांतील शेतीबरोबरच याहि पट्टयांतील आणखी कांहीं लक्ष एकर शेतीचाहि आणखी विचार करावा लागेल.

ही शेती संरक्षित करून दुष्काळापासून ह्या भागाची मुक्तता करावयाची म्हणजे शेतीसाठीं पावसाच्या पाण्यावरच अवलंबून न राहतां मोटे पाटबंधारे, नद्यांवरील लहान धरणें, तळीं, विहिरी यांच्या पाण्यावर शेती पिकविणें कितपत शक्य आहे ? या पाणीपुरवठ्याच्या योजना दख्खनच्या टापूंत यशस्वी होणें शक्य आहे हें निःसंशय. या प्रदेशाच्या पश्चिमेस असणाऱ्या सह्याद्रि पर्वताची उंची दोन हजार फूट असून तो दक्षिणोत्तर ४७० मैल पसरला आहे. या रांगांच्या ५ ते १० मैल रुंदीच्या शिखरांच्या टापूंत दरवर्षी नियमितपणें १०० ते २०० इंच पाऊस पडतो. आणि त्याच्या पूर्वेकडील उतरणीवरून नऊ मोठ्या नद्या व अगणित लहान प्रवाह उगम पावतात व पावसाळ्यांत त्यांतून उमाप पाणी वाहत जाऊन तें बंगालच्या उपसागरांत फुकट जाऊन पडतें.

आणि नुसतें पाणीच फुकट जातें असें नव्हे, तर ज्या प्रदेशांतून या नद्या वाहत जातात त्या प्रदेशांतील जमिनीवरील लाखो टन माती व शेतजमिनींतील फूल वाहून जातें. हें पाणी जर अडवून सांठवून ठेवलें व त्यांतून कालवे काढून या दुष्काळी भागांतील शेतजमिनीला तें पाणी पुरविलें, तर केवढें तरी उत्पन्न येईल ! हा भाग दुष्काळी असला तरी ज्या वर्षी पाऊसकाळ चांगला असतो त्या वर्षी या भागांत ज्वारी, गहूं, हरभरा, भुईमूग, कापूस, तूर इत्यादींचें पीक भरपूर येत असतें. एक वर्ष चांगलें पिकलें तर तीन वर्षांचें पीक येतें असें या भागांतील शेतकरी म्हणतातहि. मग जर या शेतीस सतत व निश्चित असा पाण्याचा पुरवठा होत गेला तर या प्रदेशांतील शेती-उत्पादन किती तरी वाढेल.

## दीर्घकालीन उपाययोजना

मुंबई सरकारच्या दप्तरांत आज अशा पाणीपुरवठ्याच्या सात धरणयोजना अनेक वर्षे तयार होऊन पडल्या आहेत. १९४७ सालीं युद्धोत्तर पुनर्घटना-योजनेंत त्या पुढें बारगळल्या व आता पंचवार्षिक योजनेंतहि त्यांचा समावेश नाहीं ! तीस कोटींचा जो एक निधि पंचवार्षिक योजनेंत दुष्काळी कामांसाठीं व इतर स्थानिक स्वरूपाच्या जरूरीच्या कामांसाठीं राखून ठेवला आहे, त्यांतून या धरणयोजनांवर खर्च करतां येईल असें राममूर्ती-कमिशननें सूचित केलें आहे. या योजना म्हणजे वीर, खडकवासलें, गिरणा, मुळा व कुकडी या महाराष्ट्रांतील पांच धरणयोजना व कर्नाटकांतील घटप्रभा व मलप्रभा धरणयोजना होत. महाराष्ट्रांतील हीं पांच धरणें बांधून झाल्यास या धरणांच्या पाण्यावर अंदाजें साडेसात लाख अेकर शेती भिजेल व पुणें, अहमदनगर, सोलापूर, पूर्व खानदेश व पश्चिम खानदेश येथील दुष्काळी भागांस त्यांचें पाणी मिळेल. तसेंच घटप्रभा व मलप्रभा यांच्या धरणांनीं विजापूर, धारवाड व बेळगांव यांतील दुष्काळी भागांस पाणी मिळणार असून, सहा लाख एकर शेतीस पाणी मिळेल. म्हणून सरकारनें या धरणांच्या कामास अग्रहक्क देऊन तीं कामें सुरु केल्यास खरेंखुरें दुष्काळनिवारण होणार आहे. नाहीं तर नुसत्या वरवरच्या मलमपट्टयांचा कांहीं उपयोग नाहीं.

वर उल्लेखिलेल्या मोठ्या धरणयोजना त्वरित करणें आवश्यक आहेच. पण त्याबरोबरच प्रत्येक दुष्काळी जिल्ह्याची नीट पाहणी करून तेथें तलाव, लहान बंधारे, विहिरी व जमिनीची बांधबंदिस्ती हीं कामें किती प्रमाणांत होणें शक्य आहे याची जिल्हानिहाय योजना आंखणें आवश्यक आहे. अशा जिल्हानिहाय योजना आंखून त्या पार पाडीत गेल्यास, त्या त्या जिल्ह्यांतील दुष्काळास कायमचा आळा बसणें शक्य आहे. तसेंच, दुर्जल शेतीपद्धतीची मोठ्या प्रमाणावर कास धरणें अवश्य आहे. मोठ्या धरणयोजना व जिल्हानिहाय करावयाच्या लहान पाणीपुरवठ्याच्या योजना यांचें एकसूत्रीकरणहि करणें शक्य आहे. मोठ्या धरणांचें पाणी शेतीस मिळूं लागलें तरी तें सर्व जिल्ह्यांत पोंचेल असें नाहीं. फार तर वीस-पंचवीस लक्ष एकर शेतीस त्याचा फायदा मिळेल. म्हणून उरणाऱ्या एक कोटीपेक्षां अधिक एकरांचें काय, हा प्रश्न उरतोच. फार तर १५।१६ टक्के शेतीस मोठ्या धरणांचें










पाणी मिळूं शकेल. म्हणूनच वर उल्लेखिल्याप्रमाणें जिल्हानिहाय पाहणी करून त्या त्या जिल्ह्यांतील दुष्काळ कायमचा हटविण्याच्या दृष्टीनें काय करणें शक्य आहे याची योजना आंखणें जरूर आहे. त्यामुळें पुढें कदाचित् मोठीं धरणें व जिल्ह्यांतील लहानसहान पाणीपुरवठ्याचीं साधनें यांची एक पूरक सांखळी निर्माण होऊन दुष्काळाचा कायमचा प्रतिबंध होणें अशक्य नाहीं.

दुष्काळप्रतिबंधक अशा कायमच्या उपाय-योजना आंखून त्या प्रत्यक्षांत उतरेपर्यंत कांहीं कालावधि लागणारच. हा कालावधि शक्य तेवढा कमी करण्याचा प्रयत्न सरकारनें व जनतेच्या पुढाऱ्यांनीं कसोशीनें करणें अवश्य आहे. पण दुष्काळाची भीति आहे तोंपर्यंत सरकारनें तांतडीनें करावयाच्या उपाययोजना ह्या नेहमींच सिद्ध ठेवाव्या लागणार. यासाठीं संकट-कालीं तत्परतेनें तोंड देतां येईल अशा योजना सरकारजवळ नेहमींच तयार असणें अगत्याचें आहे. अशा योजना आगाऊ तयार नसल्यास एकदम गोंधळ उडतो अगर लोकांची उपासमार होण्याचा प्रसंग ओढवतो. दुष्काळ-निवारक-कार्यक्रमांच्या योजना जशा सिद्ध ठेविल्या पाहिजेत, तसेंच सरकारनें प्रत्येक दुष्काळी जिल्ह्यांत ठिकठिकाणीं गांवोगांव पांच-सहा गांवांच्या गटांत ऐनवेळीं उपयोगी पडावा म्हणून किमान चाऱ्याचा व धान्याचा सांठा नेहमींच ठेवणें अवश्य आहे. विशेषतः या दुष्काळांतील अनुभवावरून कांहीं किमान असा चाऱ्याचा सांठा प्रत्येक ठिकाणीं सरकारनें करून ठेवणें किती जरूर आहे हें लक्षांत येतें. असे थोडेसे सांठे असले तर बाहेरून पुरवठा होईपर्यंत पहिल्या प्रथम बसणाऱ्या तडाख्यास स्थानिक सांठ्यांच्या जोरावर तोंड देतां येतें. हे सांठे सहकारी पद्धतीनें पीक-सालीं अमुक एक प्रमाणांत बांधणें लेव्हीपद्धतीनें वसूल करून शक्य आहे. नगर, सोलापूर वगैरे जिल्ह्यांत पीक-साल चांगलें असल्यास उमाप पिकतें. त्या वेळीं संकटकाळीं उपयोगी पडावें म्हणून सहकारी धान्य-बँकांमध्यें, गांवोगांव प्रत्येक शेतकऱ्याकडून सक्तीनें वसुली करून, जर किमान धान्यसांठा बांधला गेला, तर त्याचा किती तरी उपयोग होईल! दुष्काळी भागांतील शेतकऱ्यांचें उत्पादन व त्याचा खर्च यांचा केव्हांहि एक वर्षा-पुरता हिशेब न करतां नेहमींच तीन-चार वर्षांचा कालखंड धरून त्याप्रमाणें त्याच्या जमाखर्चाचें अंदाजपत्रक तयार करणें अवश्य आहे. इतका दूरवर विचार करून वागणें सर्वच शेतकऱ्यांना—विशेषतः कशी तरी गुजराण करणाऱ्या गरीब शेत-कऱ्यांना—शक्य नसलें तरी सरकारनें व जनतेच्या पुढाऱ्यांनीं अशा दूरदर्शी योजनांचें महत्त्व शेतकऱ्यांच्या मनावर सतत बिंबविणें अवश्य आहे.

## शेतीविषयक आर्थिक जीवनाच्या समस्या

या वर्षी महाराष्ट्रांत मोठ्या प्रमाणावर पडलेल्या या दुष्काळामुळें महाराष्ट्राच्या शेतीविषयक आर्थिक जीवनाच्या कांहीं गंभीर समस्या उत्कटतेनें दृष्टोत्पत्तीस आल्या. त्या नव्यानें निर्माण झाल्या असें नाहीं, तर या संकटामुळें त्यांची जाणीव तीव्रतेनें होऊं लागली. आजकाल दळणवळणाचीं साधनें विपुल असल्यामुळें, दुष्काळांत खावयास धान्य मिळालें नाहीं म्हणून मरण्याचा प्रसंग येत नाहीं. पण तें खरेदी करावयास जवळ पैसा नाहीं म्हणून मात्र मरण्याचा प्रसंग ओढवतो. त्या दृष्टीनें खरेदीशक्तीचा अभाव हें आज-कालच्या दुष्काळाचें गमक म्हणतां येईल. अर्थात् आमच्या ग्रामीण आर्थिक जीवनांत खरेदीशक्तीचा अभाव हा दुष्काळापुरताच मर्यादित नसून, बऱ्याच मोठ्या प्रमाणावर ती एक नित्याचीच बाब होऊन बसली आहे. पीक-साल चांगलें असलें तरी दुष्काळी परिस्थितींत भोगाव्या लागणाऱ्या हाल-अपेष्टा आज कित्येक शेतकऱ्यांस व शेतमजुरांस सतत भोगाव्या लागत असल्याचें आढळून येईल. पुरेसा कामधंदा नसणें हा आमच्या शेतीविषयक आर्थिक जीवनांतील एक कूटप्रश्न आहे. कांहीं मोठे शेतकरी सोडले, तर बहुसंख्य लहान मालक शेतकरी अगर खंडकरी शेतकरी यांना वर्षभर आपल्या शेतीवर कामधंदा नसतो. जवळपास अगर दूर जाऊनहि अन्य उपजीविकेचें साधन उपलब्ध नसल्यामुळें तेवढ्याच उत्पन्नावर तो कशी तरी आपली गुजराण करून जिवंत राहतो इतकेंच. दुष्काळ पडला व पिकलें नाहीं म्हणून दुष्काळी कामांची मागणी










आज शेतकऱ्यांकडून झाली. परंतु असें दिसून येईल कीं, दुष्काळासाठीं काढलेल्या आजच्या कामांच्या जवळ जवळ निम्म्यानें अगर त्याहूनहि अधिक कामें त्या जिल्ह्यांत चांगल्या पीक-सालींहि काढलीं तरी त्यांची अत्यंत गरज भासून त्यावर काम करण्यास भरपूर कामगार मिळतील.

या दुष्काळांत अडीच ते पावणेतीन लाखांपर्यंत दुष्काळी कामावरील कामगार-संख्या होती. यांपैकीं जवळ जवळ निम्मे लोक पीक-साल बरें असलें तरी तीं कामें चालू राहिल्यास त्यांवर काम करण्यास तयार होतील. एवढेंच नव्हे तर, अशीं कामें सरकारनें पीक-सालीं देखील काढावींत अशी मागणी त्यांच्याकडून होण्याचा दाट संभव आहे. जे निव्वळ शेतमजूर आहेत त्यांच्या बाबतींत तर दुष्काळ ही थोड्याफार अर्थानें फायद्याचीच बाब ठरली असें म्हणावें लागेल. कारण अशा मजुरांना शेतीवर सतत काम मिळत नाहीं. सुगीच्या अगर कापणीच्या दिवसांतच त्यांना खरें काम मिळतें व रोजगार अगर मिळकत बरी मिळते. इतर वेळीं शेतकाम नियमितपणें मिळत नाहीं व मिळाल्यास त्यासाठीं मिळणारी मजुरीहि समाधानकारक नसते. ह्या शेतमजुरांना, यंदा दुष्काळी परिस्थितीमुळें जीं कामें काढलीं गेलीं, त्यांवर सतत रोजगार मिळाला. त्यांच्या वैयक्तिक आर्थिक जीवनाच्या दृष्टीनें विचार केला तर दुष्काळी वर्ष हें त्यांच्या बाबतींत सुकाळी म्हणणें अगदींच चुकीचें ठरणार नाहीं !

## नित्याचीच बेरोजगारी

दोन्ही खानदेश व नाशिक हे नेहमीं दुष्काळ न पडणारे जिल्हे. या जिल्ह्यांतील दुष्काळी कामावर मुख्यतः शेतमजुरांचाच अधिक भरणा होता. एक उदाहरण म्हणून लक्षांत ठेवण्यासारखें आहे. पश्चिम खानदेशमध्यें शिरपूरजवळ करवंद येथें धरणाचें काम मे महिन्याच्या पहिल्या आठवड्यांत सुरू झालें. महिनाअखेर या कामावरील दुष्काळी मजुरांची संख्या १० हजारांपर्यंत गेली. यांपैकीं फक्त दीड ते दोन हजार मजूर जिल्ह्यांतील इतर दुष्काळी कामांवरून त्यांना जवळ असणाऱ्या या दुष्काळी कामावर आलेले होते. म्हणजे बाकीचे ८ हजार मजूर जवळच्या पांच-सात मैलांच्या टापूंतून चटकन् उपलब्ध झाले. बरें तसें म्हणावें तर हा भाग एवढा दुष्काळाचाहि नव्हता. तसें असतें तर हे लोक आधींच कोठेंहि दूरवरच्या कामावर पोट भरण्यासाठीं धांवले असते. सुगीच्या वेळीं केलेल्या थोड्या-फार मिळकतीवर अगर धान्यसांठ्यावर ते कशी तरी गुजराण करीत होते आणि हें काम निघालें त्या वेळीं एवढ्या मोठ्या प्रमाणांत त्यावर कामगार म्हणून उपलब्ध झाले.

या कामावरील मजुरांत मुख्यतः हरिजन व भिल्ल यांचाच भरणा अधिक होता. कमी-अधिक प्रमाणांत बहुतेक दुष्काळी कामांवर याच लोकांची संख्या जास्त असल्याचें आढळून येईल. नगर, सोलापूर व पुणें जिल्ह्याचा पूर्व भाग यांमध्यें दुष्काळी कामांवर मराठा शेतकरीवर्ग मजूर म्हणून जरा जास्त प्रमाणावर आढळला तरी हरिजन व त्यांसारखे भूमिहीन शेतमजूर यांची संख्याहि भरपूर होती. वर करवंदचें जें उदाहरण दिलें आहे तें एवढ्याचसाठीं कीं, शेतकऱ्यांच्या अगर शेतमजुरांच्या बेरोजगारीचा प्रश्न निव्वळ दुष्काळापुरता मर्यादित नसून, ती एक नित्याचीच बाब आहे हें ध्यानांत यावें. ह्या गोष्टी लक्षांत घेतल्या असतां महाराष्ट्राच्या शेतीविषयक आर्थिक समस्यांचा गंभीरपणें विचार करणें अवश्य आहे असें दिसून येईल. शेती हा शेतकऱ्यांना व शेतमजुरांना अत्यंत अपुरा धंदा आहे. क्रयशक्तीचा अभाव हें दुष्काळाचें गमक मानलें, तर ही दुष्काळी परिस्थिति थोडयाफार प्रमाणांत आमच्या शेतकऱ्यास नेहमींचीच आहे. म्हणून पाणीपुरवठ्याचीं साधनें भरपूर निर्माण करून महाराष्ट्राची शेती सुरक्षित करणें जितकें महत्त्वाचें आहे, तितकेंच महाराष्ट्राच्या ग्रामीण जीवनांतील ही नित्याची बेरोजगारी कमी करणेंहि तितकेंच अगत्याचें आहे. ती कमी करणें हें दुष्काळनिवारक योजनांत बसत नसलें तरी दुष्काळनिवारक योजनांचे अपेक्षित परिणाम घडून येण्यास त्याकडे दुर्लक्ष करून कधींहि भागणार नाहीं. शेतमजुरांना व लहान शेतकऱ्यांना जवळपास उद्योगधंदा निर्माण करून, त्यांची मिळकत व पर्यायानें त्यांची क्रयशक्ति वाढविणें अत्यंत आवश्यक आहे. हा महाराष्ट्रासच नव्हे तर यच्चयावत् भारतीय










ग्रामीण आर्थिक जीवनास ग्रासणारा कूटप्रश्न आहे. शेतीउत्पादनाच्या दृष्टीनें मागसलेल्या भागांत तर तो अधिकच तीव्र आहे. म्हणून दुष्काळ कायमचा हटावा या दृष्टीनें ज्या योजना आंखल्या जातील त्यांच्या जोडीस मोठ्या प्रमाणावर अस्तित्वांत असलेली पण उघडपणें दिसून न येणारी ही ग्रामीण बेरोजगारी नाहींशी करण्याच्याहि योजना जर आंखल्या नाहींत तर दुष्काळामुळें निर्माण होणारे जनतेचे प्रश्न अगर होणारे त्यांचे हाल कायमचे टळण्याचा सुतराम् संभव नाहीं !

———

## "कशास पुसतां त्याचं नांव ?"

कानीं सांगे पिंपळावरचा
"दावतों, राव गांव अमुचा
हजार तसा एक गांव
कशास पुसतां त्याचं नांव ?"

दगडी पार उंच पिंपळ
ढगांत पानं करती सळसळ
हणमंताचं देवळ छान
समोर वेस उंच कमान

"आंत चला ही बाजारपेठ
ओढ्यापोतर वसली थेट
वळणावरती शाळा गांवची
पलीकडे ती गिरण पिठाची

"गिरणी भंवतीं एकच दंगल
कानीं किटते कर्कश भकभक
शाळेमध्यें एकच गोंधळ
पंतोजी–पोरांची झकझक

"मंदिरांतली घंटा किणकिण
मृदंग झांजा रात्रीं खणखण
पेठेमध्यें धांदल गडबड
देणे–घेणें गर्दी बडबड

"झाली सांज आतां राव
पाहुन झाला अमुचा गांव
नेहमीं येथें धामधूम
धामधूम धामधूम

"झाली रात बघतां काय ?
राव, कांहीं हेरलंत् काय ?
दुष्काळाचा बसला घाव
आटुन गेला सारा गांव

"कुणास ठावं राजा कोण ?
असेल कोणी राम रावण
दूर कुठेंशी आहे दिल्ली
अमुचा कोण येथें वाली ?

"डोळ्यांमधलं पाणी तुटलं
छातीमधलं रगत आटलं
भरलं गांव झालं स्मशान
लावा नीट डोळे कान

"धरती सपाट आकाश अफाट
मध्येंच काळोख भरला दाट
कोठें दार उघडं नाहीं
दिव्यांत तेल वात नाहीं

"जळेल काय उजळेल काय ?
जगेल काय जगवील काय ?
मोटेवरचीं गाणीं सरलीं
जात्यावरची ओवी कुठली ?

"नाहीं मुंकणें ना हंबरडा
नाहीं कुजबुज नाहीं ओरडा
बाया–बापे मुलं–लेंकरूं
ढोरं कुत्रीं चिटपांखरूं

"सारे सारे पांगुन गेले
आत्मे सारे सदेह गेले
हाडूक नुसतें येथें उरलें
चघळणारे तेही गेले

"कालपोतर धामधूम
धामधूम धामधूम
आज येथें सामसूम
सामसूम सामसूम

"झाली रातच पुरती राव
पाहून झाला आमचा गांव
हजार तसा एक गांव
कशास पुसतां त्याचं नांव ?"

—दि. के. बेडेकर











अनुक्रमणिका

आल्फाँस आले–अनुवादक : श्री. स. शं. देसाई

# ☆ ☆ त्याची जात !

त्याचा नि माझा परिचय पॅरिस शहराच्या लॅटिन वस्तींतील एका विश्रांतिगृहांत झाला. मी ज्या टेबलावर बसलों होतों त्याच टेबलावर तोहि येऊन बसला व त्यानें एकदम सहा कप कॉफीची ऑर्डर दिली. मला वाटलें, त्याच्या मागून आणखी पांचजण यायचे असतील म्हणून त्यानें सहा कप कॉफी मागविली असेल. पण माझा अंदाज चुकीचा होता. ती सहा कप कॉफी त्यानें स्वतःसाठींच मागविली होती. एका मागून एक कप तोंडास लावून त्यानें ते सहाहि कप रिकामे केले. आणि त्याचें तें करणें बरोबर नव्हतें का ? सहा कप कॉफी मावण्याएवढा मोठा कप 'वेटर' तरी कोठून आणणार होता ? त्याचा तो कॉफी पिण्याचा विक्रम चालला असतां मी त्याच्याकडे आ ऽ वासून आश्चर्यचकित नजरेनें पाहत राहिलों होतों. तें त्याच्या नजरेंतून सुटलें नाहीं आणि त्यामुळेंच तर त्याचा आणि माझा परिचय झाला.

मला आपल्याकडे आश्चर्यानें बघतांना पाहून तो मला म्हणाला, " माझ्या अति कॉफीसेवनाचें आपणांस आश्चर्य वाटलें का ? पण मी **बाल्झाक**च्या जातीचा मनुष्य आहे, हें कदाचित् आपणांस माहीत नसेल. बाल्झाकप्रमाणें माझेंहि कॉफीचें व्यसन भयंकर आहे ! "

तें ऐकून मला आनंद झाला. कारण बाल्झाक हा माझा आवडता लेखक होता. तो मनुष्य बाल्झाकच्या जातीचा असल्याचें कळतांच त्याच्याविषयीं मला आपुलकी वाटूं लागली व मीं माझी खुर्ची त्याच्या शेजारीं ओढली. त्याच वेळीं तेथून एक वेटर जात होता. त्यानें त्या वेटरला कागद आणि दौत-टांक आणण्याचा हुकूम केला. लेखनाचें सामान टेबलावर हजर होतांच त्यानें अस्तन्या सांवरून लिहावयास सुरुवात केली. पण तें लिखाण त्याला आवडलें नाहीं. त्यानें त्या कागदाचा चोळामोळा केला व तो टेबलाखालीं फेंकून दिला. त्यानंतर त्यानें अनेक वेळां तीच क्रिया केली. तथापि माझी कुतूहलजनक नजर त्याच्यावर खिळलेलीच होती. तें पाहून तो आपल्या पूर्वींच्याच अकृत्रिम आवाजांत म्हणाला :

" मी **फ्लोबेर्त**च्या जातीचा मनुष्य आहे. भाषाशैलीवर माझा मोठा कटाक्ष आहे. "

त्यानंतर त्याचें नि माझें कसल्या तरी विषयावर संभाषण सुरू झालें. संभाषणाच्या ओघांत त्यानें मला माझें जन्मस्थान विचारलें. मीं जेव्हां त्याला माझें जन्मस्थान सांगितलें, तेव्हां मी जन्मानें ' नॉर्मन ' असल्याचें पाहून तो चेहऱ्यावर तुच्छता दर्शवीत म्हणाला :

" मी **शार्लेमान** राजाच्या जातीचा मनुष्य आहे. मला नॉर्मन लोक आवडत नाहींत. "

माझें जन्मगांव कळल्यावर त्यानें मला आपलें जन्मगांव सांगितलें. त्याचा जन्म लियाँ शहरांत झाला होता. त्याचा बाप खाटकाचा धंदा करीत होता व आपल्या मुलानेंहि आपल्या धंद्यांत पडावें अशी त्याची इच्छा होती. तें सांगून झाल्यावर तो मला म्हणाला :

" मी **शेक्सपिअर**च्या जातीचा मनुष्य आहे. मला बापाचा धंदा आवडत नाहीं. "

त्याच्या प्रेयसीचें नांव **जोसेफाईन** असल्याचें मला त्याच्या पुढील उद्गारांवरून कळलें : " मी **नेपोलिअन**च्या जातीचा माणूस आहे. माझ्या प्रेयसीचें नांव जोसेफाईन आहे. "

पुढें कांहीं दिवसांनीं तो जेव्हां मला पुनः भेटला तेव्हां त्याची प्रेयसी त्याला सोडून गेल्याचें त्यानें मला सांगितलें. ती एका इंग्लिश माणसाबरोबर पळून गेली होती. त्याविषयीं बोलतांना तो म्हणाला :

---

( Alphonse Alais ) **आल्फाँस आले** ( १८५४–१९०५ ) : एक प्रसिद्ध फ्रेंच विनोदी लेखक व नाटककार. प्रस्तुत कथा त्याच्या एका विनोदी लघुकथेचा अनुवाद आहे. —अनुवादक.

"मी मोलिअरच्या जातीचा मनुष्य आहे. मोलियरलाहि स्त्रियांनीं असेंच फसविलें आहे"

त्यानंतर एके दिवशीं आम्हीं सहभोजन करण्याचें ठरविलें. ठरल्याप्रमाणें तो भोजनासाठीं अगदीं वेळेवर हजर झाला. मी थोडा उशीरां आलों. माझें आगमन होतांच त्यानें मुकाट्यानें खिशांतून घड्याळ बाहेर काढलें व तें मला दाखवीत तो म्हणाला, "मी चौदाव्या लुईच्या जातीचा मनुष्य आहे. मला थांबणें माहीत नाहीं."

एकदां त्याला डोळ्याचा रोग झाला. त्याची दृष्टीच जायची, पण थोडक्यांत निभावलें. त्याविषयीं बोलतांना तो म्हणाला : "मी मिल्टन किंवा होमरच्या जातीचा मनुष्य व्हायचा. पण..."

पुढें कांहीं दिवसांनीं त्याचें दुसऱ्या एका तरुणीवर प्रेम बसलें. पण त्याहि तरुणीनें त्याच्याशीं बेइमानी केली. तें पाहून तो रागानें बेफाम झाला व त्या भरांत त्यानें तिचा खून केला. पोलिसांनीं त्याच्या हातांत बेड्या ठोकल्या व 'सदोष मनुष्यवधा'च्या आरोपावरून त्याच्यावर खटला भरला. त्याला न्यायमूर्तींसमोर उभें केलें, तेव्हां तो आपल्या जबानींत म्हणाला.

"मी...अंतनीच्या जातीचा मनुष्य आहे. तिनें माझा प्रतिकार केला म्हणून मीं तिला ठार मारलें."

त्याला फांशीची शिक्षा झाली!

अखेरच्या दिवशीं मी त्याला भेटावयास गेलों. हात पाठीमागें बांधलेले व अंगांतला शर्ट फाटलेला—अशा स्थितींतली त्याची ती बापुडी मूर्ति पाहून मला त्याची कींव आली. नकळत माझ्या तोंडून 'गरीब बिचारा!' असे उद्गार बाहेर पडले.

पण मला पाहतांच तो बेफिकीरपणें म्हणाला :

"मी ख्रिस्ताच्या जातीचा मनुष्य आहे. मी वयाच्या तेहतिसाव्या वर्षीं फांसावर जात आहे!"

---

## एका संस्कृतीची कथा!

प्रा. दे. अ. दाभोलकर

वांग लून.

जीवनांत त्याला एकच महत्त्वाकांक्षा होती.

देहान्त शिक्षा झालेल्या माणसाचें डोकें उडविण्याची कामगिरी वांग लूनकडे असे. माणसाचें शिर तर तुटावें पण तें मानेवरून रेसभरहि ढळूं मात्र नये, असा जोराचा सफाईदार घाव आपल्याला घालतां यावा, असें वांग लूनला सारखें वाटे. खड्गाच्या एका कुशल वारानें लिंबाचे मधोमध दोन तुकडे व्हावेत, परंतु लिंबाचा अखंड आकार मात्र बाह्यतः यत्किंचित्‌हि बिघडूं नये, त्याप्रमाणें!

हाच आदर्श आयुष्यभर वांग लूनच्या नजरेसमोर होता. म्हणून वधाचा आदेश झालेला माणूस वधस्तंभावर येऊन उभा राहिला कीं वांग लूनचे हात उत्कंठेनें शिवशिवूं लागत.

आज त्याच्या भाग्याचा दिवस उजाडला होता. एक नव्हे, दोन नव्हे, सोळा जणांना आज वधाची शिक्षा झाली होती. आज आपल्या प्रयत्नाची त्याला अनेकदां उजळणी करतां येणार होती.

अकरा माणसांचा वध झाला. परंतु वांग लूनची महत्त्वाकांक्षा सफल झाली नव्हती.

बारावा माणूस वधस्तंभावर चढत असतांनाच वांग लूननें पाठीमागून सफाईनें घाव घातला. इतक्या सफाईनें कीं लिंबू चिरावें तसा!

वांग लूनची जीवनांतील महत्त्वाकांक्षा पुरी झाली होती. आपली मान चिरली गेल्याचें त्या माणसाला कळलेंहि नाहीं. वधस्तंभावर उभा राहून तो वांग लूनला म्हणाला, 'वांग लून, उगाच वेळ कां लावतोस? ज्या झटक्यांत तूं इतरांना क्षणार्धांत मुक्त केलेस, तसाच एका झटक्यांत मलाहि तूं सोडवूं शकणार नाहींस काय?'

वांग लूनचें स्वप्न साकार सत्य झालें होतें.

कृतार्थतेनें वांग लून म्हणाला, 'माझ्या मित्रा, तूं जरा खालीं मान लवबावयाचाच अवकाश'—!

—(आर्थर कोस्लरच्या 'Arrow in the Blue' या आत्मचरित्रांत दिलेल्या एक चिनी कथेवरून.)

---







डेक्कन कॉलेज-संस्थेमध्यें भरलेल्या भाषाभिज्ञ-परिषदेच्या कार्याचा परिचय : डॉ. मु. ग. पानसे

# भारतीय देशभाषांच्या तुलनात्मक अभ्यासाची योजना

भारतीय राज्यघटनेप्रमाणें पंधरा वर्षांच्या अवधींत राष्ट्रभाषा म्हणून हिंदीनें इंग्रजीची जागा घ्यावी व प्रत्येक घटकराज्याची देशभाषा आपापल्या परीनें स्वतंत्रपणें आपले सर्व व्यवहार करण्यास समर्थ व्हावी, असा अंदाज आहे. अशा परिस्थितींत हिंदुस्थानांतील सर्व प्रमुख देशभाषाभाषिकांचा परस्परांशीं व केंद्रीय सरकारशीं सुरळितपणें व्यवहार होण्याच्या दृष्टीनें विचार झाला पाहिजे. आणि एका ठराविक मर्यादेपलीकडे भाषा-भाषांमधील भिन्नता नेहमींच्या व्यवहारापुरती तरी फारशी जाणवूं नये, म्हणून सर्व भाषांच्या शास्त्रीय अभ्यास करून, स्वीकरणीय असा एक सर्वभाषा-सामान्य व्यावहारिक शब्दसंग्रह तयार करण्याची भाषाशास्त्रज्ञांस आवश्यकता वाटते.

भाषा आणि बोली यांबाबत हिंदुस्थान अतिशय संपन्न आहे. साधारणतः सात गट पडतील अशा ८०० भाषा व त्या प्रत्येकीच्या निरनिराळ्या पोटभाषा या देशांत उपलब्ध आहेत. अलीकडच्या राजकीय व सामाजिक परिस्थितीमुळें ज्या भाषा अथवा बोली प्रचारांतून हळूहळू नष्ट होत आहेत त्यांचा प्रथम अभ्यास होणें फार महत्त्वाचें आहे.

जेव्हां शिक्षण आणि शासनव्यवहार देशभाषेंतून होऊं लागतील व बहुजनसमाजामध्यें साक्षरतेचा प्रसार होईल तेव्हां प्रत्येक व्यक्तीला मातृभाषे-व्यतिरिक्त किमान एक तरी देशभाषा अवगत असणें अवश्य होईल. त्यासाठीं प्रौढांना स्वकीयेतर देशभाषेचें ज्ञान सुलभतेनें व्हावें यासाठीं आणि शाळेंतील साधारणतः ८ व्या इयत्तेच्या पुढील विद्यार्थ्यांची गरज भागविण्यासाठीं, निरनिराळ्या देशभाषांचे समान शब्दसमूह (common vocabulary) अतिशय उपयोगी पडतील आणि प्रत्येक देशभाषेच्या आपापल्यापरीनें होत असलेल्या विकासांत प्रत्यवाय न येतां देशभाषा-भाषिकांचे आपापसांतील व्यवहार समाधानकारक होतील. या दिशेनें कांहीं प्रगति करावयाची असेल, तर यापुढचा दहा वर्षांचा काल विनाविलंब कारणीं लावणें महत्त्वाचें आहे.

या विधायक कार्याला शक्य तों लवकर सुरुवात व्हावी या जाणिवेनें प्रेरित होऊन, 'डेक्कन कॉलेज' या संस्थेचे डायरेक्टर **डॉ. सुमित्र मंगेश कत्रे** यांनीं स्थूलमानानें एक योजना तयार केली व तिच्या-विचारविनिमयासाठीं प्रत्येक देशभाषेच्या भाषा-भिज्ञ विद्वानांना निमंत्रण केलें. डेक्कन कॉलेजमध्यें (१९५३ मे-ता. २६ ते २९) भाषाभिज्ञ विद्वानांची ही परिषद् भरली. या प्राति-निधिक अनौपचारिक परिषदेस अनेक भाषांचे प्रतिनिधि आणि दोन समाजशास्त्रज्ञ व दोन शिक्षण-तज्ज्ञ उपस्थित होते. या परिषदेंत डेक्कन कॉलेजचे माजी डायरेक्टर डॉ. तारापोरवाला, कलकत्त्याचे डॉ. सुनीतिकुमार चतर्जी, नागपूरचे डॉ. रघुवीर, अलाहाबादचे डॉ. बाबूराम सक्सेना, पाटण्याचे डॉ. विश्वनाथ प्रसाद, धारवाडचे प्रा. टी. एन्. श्रीकांतैय्या, लंडन युनिव्हर्सिटीचे सर राल्फ टर्नर, अमेरिकेंतील विस्कॉनसिन विद्यापीठाचे प्राध्यापक मरे फाउलर वगैरे मंडळींनीं चर्चेत प्रामुख्यानें भाग घेतला.

भाषाशास्त्रज्ञ म्हणून प्रतिष्ठा पावलेल्या डॉ. सिद्धेश्वर वर्मा, डॉ. बनारसीदास जैन, डॉ. रघुवीर, डॉ. गोडवर्मा, डॉ. बाबूराम सक्सेना, डॉ. कत्रे, डॉ. नरसिंहय्या वगैरे पंडितांच्या पिढीला गुरु-स्थानीं असलेले **सर राल्फ टर्नर** हे या प्राति-निधिक परिषदेचे अध्यक्ष होते. डॉ. टर्नर यांच्या संशोधनाचें क्षेत्र 'आर्यभाषाविज्ञान' हें आहे. ५० वर्षांपूर्वीं जॉन पील-(Peile)च्या भाषा-शास्त्रावरील एका प्राथमिक पुस्तकांत टर्नर यांनीं संस्कृतचें नांव प्रथम वाचलें. त्यांना संस्कृतचे पहिले पाठ देणारे गुरु त्यांच्या केंब्रिजच्या पर्स स्कूलचे हेडमास्तर डब्ल्यू. एच्. डी. राउस हे होते आणि नंतर विद्यापीठांत दाखल झाल्यावर 'क्राइस्त कॉलेज'चे फेलो जॉन पील (Peile)







यांनीं टर्नरना संस्कृतचें मार्गदर्शन केलें. विद्यापीठांत ग्रीक व लॅटिन भाषांचा अभ्यास करीत असतांना टर्नर यांचा ओढा त्या भाषांचें ऐतिहासिक व्याकरण व त्यांचा आर्यभाषांशीं संबंध यांकडे होता. म्हणून अभ्यासक्रमाच्या तिसऱ्या व चौथ्या वर्षी संस्कृत भाषा व तौलनिक व्याकरण यांकडे ते वळले. जॉन पील यांच्यानंतर ' क्राइस्ट कॉलेज ' मध्यें ' फेलो ' म्हणून त्यांची नेमणूक झाली. गोटिंगेन येथें ओल्डेन्बर्ग आणि वाकरनागेल, परिसमध्यें सिल्व्हँ लेव्ही, लायडेनचे स्पेयेर, ब्रूसेल्स येथें ला व्हाले पूसँ ( La Vallee Poussin ) यांच्या हाताखालीं कांहीं दिवस अभ्यास करून, १९१३ सालीं बनारसच्या ' क्रीन्स कॉलेज 'मध्यें डॉ. टर्नर संस्कृतचे ' लेक्चरर ' म्हणून नेमले गेले. पुढें १९२० मध्यें बनारस हिंदु-विद्यापीठांत भारतीय भाषाविज्ञानाचे ते प्राध्यापक झाले. १९१४ व १९२२ सालीं त्यांनीं मुंबईस ' विल्सन फायलालॉजिकल लेक्चर्स' दिलीं. पहिल्या महायुद्धांत १९१५-१९१९ च्या दरम्यान लष्करी विभागांत काम करीत असतांना टर्नर यांनीं आपल्या नेपाळी शब्दकोशाचें साहित्य जमा केलें. १९२२ पासून लंडन विद्यापीठांत संस्कृतचे प्राध्यापक व १९३७ पासून लंडनच्या ' स्कूल ऑफ ओरिएन्टल ॲन्ड आफ्रिकन स्टडीज 'चे ते डायरेक्टर आहेत. शिवाय ' रॉयल एशियाटिक सोसायटी 'चे ते डायरेक्टर आहेत. १९५० सालीं ' सर ' ही पदवी डॉ. टर्नर यांना देण्यांत आली.

सर राल्फ टर्नर यांच्या ग्रंथांपैकीं ( 1 ) Gujarati Phonology, ( 2 ) The Position of Romani in Indo-Aryan, ( 3 ) A Comparative and Etymological Dictionary of the Nepali Language, ( 4 ) The Gavimatha and Palkigundu Inscription of Ashoka इत्यादि विशेष प्रसिद्ध आहेत. शिवाय प्रो. ई. जे. रॅप्सन यांना अर्पण केलेला Indian Studies व सर जॉर्ज ग्रीयर्सन यांना अर्पिलेला Indian and Iranian Studies-या ग्रंथांचें संपादन त्यांनीं केलें आहे. हल्लीं त्यांचें सर्व आर्यभाषांचा एक शब्दकोश तयार करण्याचें काम चालू आहे.

येथील परिषदेच्या आपल्या अध्यक्षीय भाषणांत **सर राल्फ** यांनीं संस्कृत भाषेचा परिचय झाल्यापासून आजतागायत ज्या विद्वानांच्या सान्निध्यामुळें त्यांच्या अभ्यासास अखंड चालना मिळत राहिली त्यांचा कृतज्ञतापूर्वक उल्लेख करून, " परिषदेपुढें चर्चेस ठेविलेल्या योजनेचा भर शब्दांची पद्धतशीर निवड व शब्दसंग्रहाची उसनवारी या गोष्टींवरच आहे, नव्या बनावटीचे शब्द तयार करून ते वापरांत आणण्याचा हेतु नाहीं " हें स्पष्ट केलें. इतर कोणत्याहि देशापेक्षां हिंदुस्थानांत वेगवेगळ्या भाषांची आपापसांत सढळपणें देवाणघेवाण करतां येण्यासारखी अनुकूल परिस्थिति आहे. आर्यभाषांप्रमाणेंच द्राविडभाषांनींहि ग्रांथिक आणि व्यावहारिक उपयोगाकरितां संस्कृताचें मोठें ऋण घेतलें आहे हें सोदाहरण दाखवून, एकाच ठराविक पद्धतीनुसार प्रत्येक देशभाषेचें एक एक सुटसुटीत ऐतिहासिक व्याकरण लिहिलें जावें अशी सूचना त्यांनीं केली. शेवटीं परिषदेपुढें आलेल्या योजनेसाठीं प्रादेशिक शिक्षणखात्यांकडून व केन्द्रीय सरकारकडून आर्थिक मदतीची अपेक्षा केल्यास गैरवाजवी होणार नाहीं, असें आपलें मत त्यांनीं व्यक्त केलें.

**डॉ. कत्रे** यांनीं विद्वानांपुढें मांडलेली योजना थोडक्यांत अशी: ( १ ) आर्य व द्राविड भाषांचे शब्दपर्यायकोश ( Synonymic Dictionary ) तयार करून जास्तींत जास्त भाषांमध्यें सारखेपणानें अस्तित्वांत असलेल्या शब्दांची उपयुक्ततेच्या दृष्टीनें क्रमवारी ( grading ) लावावी. ( २ ) प्रत्येक देशभाषेंतील उपलब्ध शब्दसंपत्ति तपासून ८ व्या इयत्तेच्या व पुढील विद्यार्थ्यांना उपयोगांत आणतां येतील अशा शब्दसंग्रहांची इयत्तेच्या मानानें जुळणी करावी. ( ३ ) विद्यार्थ्यांसाठीं निवडलेले हे शब्द त्या भाषेच्या शब्दपर्यायकोशाशीं पडताळून जरूर ते फेरबदल करावे. ( ४ ) फेरबदल झाल्यावर तयार झालेला शब्दसमूह शैक्षणिक, सामाजिक व सांस्कृतिक दृष्ट्या नेहमींच्या व्यवहारांत कितपत लागू पडतो तें पाहून, तज्जन्य प्रश्नांकडे जास्त लक्ष पुरवावें. ( ५ ) प्रत्येक देशभाषेमधील प्रचलित किमान शब्दसंग्रहा-( basic vocabulary )च्या

समृद्धीच्या दृष्टीनें त्या भाषेंच्या पोटभाषां-( dialects )चा नीट अभ्यास व्हावा. ( ६ ) या योजनेंचें कार्य सर्वत्र एकाच पद्धतीनें व्हावें म्हणून भाषाविज्ञान व शास्त्रपद्धति यांचें रीतसर शिक्षण देऊन नवीन कार्यकर्ते तयार करावेत. ( ७ ) हातीं घेतलें जाणारें कार्य अतिव्यापक असल्यामुळें त्यांत एकसूत्रीपणा राहावा म्हणून या योजनेंतील कामाची बारकाईनें निश्चित रूपरेषा ठरवून सहकाऱ्यांची निवड करण्याकरितां व होत असलेल्या कामासंबंधीं वेळोवेळीं आवश्यक त्या सूचना देण्यासाठीं पांच-सहा विद्वानांची एक सल्लागार-समिति नेमावी. ( ८ ) भाषाविशिष्ट अशा उत्पन्न होणाऱ्या अडचणी, कांहीं पारिभाषिक अर्थवैशिष्ट्य आणि चालू असलेलें काम--यांबाबत प्रत्यक्ष मार्गदर्शन करण्यासाठीं प्रत्येक भाषेंतील एक भाषाभिज्ञ व शिक्षणतज्ज्ञ नेमला जावा. ( ९ ) सल्लागार, मार्गदर्शक व प्रत्यक्ष सहकार्य देणारे विद्वान् यांची एक सभा भरवून त्या सभेंत, सुरू केल्या जाणाऱ्या प्रत्यक्ष कामासंबंधीं सांगोपांग चर्चा करून, प्रत्येक भाषेसंबंधीं कोणतें काम आधीं, कोणतें नंतर करणें सोयीचें होईल हें ठरवावें व मग प्रत्येक भाषा-गटानें आपलें कार्य स्वतंत्रपणें सुरू करावें. ( १० ) कार्य सुरू झाल्यावर त्याच्या सर्वांगीण प्रगतीसाठीं आणि तयार होणाऱ्या शब्दसंग्रहाचा व्यवहारांत उपयोग करून पाहण्या-साठीं आपापल्या भाषाविभागांत कार्यक्षम अशा सर्व संस्थांची मदत घ्यावी.

अर्थात्, या सर्व योजनेच्या पूर्ततेकरितां लागणारी साधनसामग्री जमविणें ही कल्पनाहि योजनेंत अन्तर्भूत आहेच.

डॉ० कत्रे यांनीं वरील योजना विद्वानांपुढें ठेविली त्याच वेळीं तीमधील एकेका मुद्द्यासंबंधीं चर्चेच्या सोयीसाठीं आधीं लेखी सूचना मागविल्या होत्या. त्याशिवाय पुढील कांहीं मुद्दे लक्षांत घेणें अवश्य असल्याचें त्यांनीं नमूद केलें आहे: (१) प्रान्तान्तर्गत व्यवहार आणि आंतरराष्ट्रीय संबंध या दृष्टीनें देशभाषा व राष्ट्रभाषा ( हिंदी ) आणि देशभाषा व आंतरराष्ट्रीय भाषा ( इंग्लिश ) यांचा मेळ अविरोधानें कसा घालतां येईल? (२) दोन अथवा अधिक भाषाभाषी विद्यार्थी प्रादेशिक सीमारेषेवर शिक्षण घेत असतां उपस्थित होणारे प्रश्न कोणते व ते कसे सोडवितां येतील? (३) सर्व प्रचलित लिपींमधून एकादी राष्ट्रलिपि सर्व भाषांना सारखी लागू पडेल अशी तयार होणें शक्य आहे काय? (४) सर्व भारतीय भाषांना चालेल असें टंक-लेखन-यंत्र ( Type-writer ) तयार करण्याची शक्यता आहे काय?

प्रत्येक देशभाषेचा विज्ञानदृष्ट्या आजपर्यंत किती अभ्यास झाला, हल्लीं काय चालू आहे, कोणत्या क्षेत्रांत अभ्यासाची गरज आहे आणि हल्लीं उपलब्ध असलेल्या साधनांच्या साहाय्यानें कितपत काम होणें शक्य आहे वगैरेसंबंधीं प्रत्येक भाषेच्या प्रतिनिधींनीं परिषदेच्या सुरुवातीस माहिती दिली. पैकीं द्राविडी, गुजराती, मराठी, हिंदी व बंगाली भाषेंत थोडाबहुत अभ्यास झाला आहे, परंतु अजून पुष्कळच व्हावयास पाहिजे, असाच प्रत्येकाचा सूर होता.

देशभाषांमध्यें सर्रास प्रचलित असलेल्या शब्दांच्या रूपसादृश्याबरोबर अर्थदृष्ट्या असलेल्या साधर्म्याकडे सूक्ष्मपणें पाहून समान शब्दसंग्रह ( common vocabulary ) करावयास पाहिजेत--या सूचनेबद्दल बोलतांना **डॉ. रघुवीर** यांनीं पुढीलप्रमाणें आपलें मत व्यक्त केलें: "आर्य-भाषांच्या पूर्वेकडील गटाचा ( बंगाली, आसामी, ओरिया यांचा ) एक सामान्य शब्दसंग्रह करावा. तसेंच द्राविडभाषांसाठीं एक आणि इतर कोणत्याहि दोन भाषांकरितां एक एक द्विभाषाकोश ( Bilingual Dictionary ) व्हावा. उदा० गुजराती-मराठी, मराठी-कानडी, हिंदी-आसामी, तेलगु-कानडी, तामिळ-मल्याळम् वगैरे. हे शब्द-कोश तयार झाले म्हणजे सर्व भारतीय भाषां-मिळून एक सामान्य शब्दसंग्रह करण्यांत यावा. अखिलभारतीय भाषांच्या सामान्य शब्दसंग्रहाचे ( १ ) तत्सम व ( २ ) तद्भव असे दोन भाग पडतील. या संग्रहांतील अदमासें ५००० शब्द प्रत्येक मुलामुलीला शाळेच्या अभ्यासक्रमांत शिकविले जावेत. त्यासाठीं इयत्तांच्या मानानें वर्गीकरण कसें करावयाचें तें शिक्षणतज्ज्ञांनीं ठरवावें. ग्रिअरसनच्या काश्मीरी शब्दकोशाप्रमाणें पाहिलें








तर सर्व भाषांमध्यें सारखेच असणारे शब्द अंदाजें शंभर असतील म्हणून विचारांत घेतल्या जाणाऱ्या बारा भाषांपैकीं जास्तींत जास्त भाषांमध्यें सांपडतील असे शब्द निवडणें जरूर आहे. ”

वस्तुतः सामान्य शब्दसंग्रह तयार करण्यामागें दोन हेतू आहेत : पहिला असा कीं, मनुष्य परभाषा-प्रांतांत गेला तरी त्याचा दैनंदिन कारभार भाषे-अभावीं अडूं नये. आणि दुसरा हेतु म्हणजे सरकारी कामकाजाबाबत प्रांताप्रांतांतील व्यवहार सुरळितपणें चालावेत व ज्ञानाच्या निरनिराळ्या क्षेत्रांतील परिभाषा बहुंशीं सारखी असावी. सामान्यतः सर्व भाषांत सारखेच असणारे शब्द पसंत करतांना, भाषांच्या सातहि गटांमध्यें प्रचलित असलेल्या शब्दांना प्रथम स्थान मिळेल. नंतर सहा गटांमध्यें वापरांत असलेले, त्यांच्यामागून पांच गटांमध्यें असलेले—अशीच वर्गवारी करावी लागणार आहे.

द्विभाषाकोशांप्रमाणेंच प्रत्येक भाषेचा एक किमान शब्दसंग्रह ( Basic Vocabulary ) व्हावयास हवा. बालक मातृभाषा शिकावयास लागल्यापासून क्रमाक्रमानें त्याचा विकास होण्यासाठीं किमान शब्दसमुच्चय अति उपयुक्त ठरतील. या विषयाच्या अनुरोधानें प्रा. सुलभा पाणंदीकर यांनीं पुढील माहिती सांगितली : “ सर्वसाधारण व्यवहारांत जरूरअसणाऱ्या शब्दांच्या मागील कल्पना सामान्यतः सारख्याच असल्यामुळें इंग्लिशच्या Basic Vocabulary चा आधार घेऊन प्रत्येक भाषेसाठीं शब्दांचा संग्रह करणें शक्य आहे. शिवाय मुलांच्या बोलण्यांत व वाचण्यांत येणाऱ्या शब्दांची, त्यांचा विकासक्रम लक्षांत घेऊन, निवड करणें जरूर आहे. बालशब्दसंग्रहाचे ( १ ) ओळखतां येणारे आणि ( २ ) वापरतां येणारे असे दोन प्रकार असतात. यांपैकीं दुसऱ्या प्रकारचा शब्दसंग्रह करण्याचें काम मराठी व गुजराती भाषांत चालू आहे. पांचव्या इयत्तेच्या विद्यार्थ्यांच्या वाचनांत वारंवार येणाऱ्या शब्दांच्या याद्या ( frequency lists ) तयार झाल्या असून, मराठी किंवा गुजरातीचा किमान शब्दसंग्रह तयार नसला तरी त्यासाठीं लागणारें प्राथमिक कार्य बरेंच झालेलें आहे. ”

भाषाविज्ञानाच्या अभ्यासाचा प्रसार व्हावा म्हणून खालील मूलभूत गोष्टींसंबंधीं परिषदेमार्फत खटपट केली जावी असें ठरलें : ( १ ) प्रत्येक विद्यापीठाच्या बी. ए. व एम्. ए. च्या अभ्यासक्रमांत भाषाविज्ञान हा स्वतंत्र विषय असावा आणि ध्वनिविज्ञाना-( Phonetics ) च्या अभ्यासाला आवश्यक अशा प्रयोगशाळेची व्यवस्था व्हावी. (२) सर्व प्रमुख देशभाषांचीं ऐतिहासिक व्याकरणें ( Historical Grammars ) तयार करावीं. ( ३ ) पोटभाषांचा अभ्यास व उपभाषांचा प्रादेशिक भूगोल ( Dialect Geography ) हें काम पहिल्या प्रथम सुरु करावें. ( ४ ) महत्त्वाच्या ग्रंथांच्या चिकित्सात्मक आवृत्त्या काढाव्यात. ( ५ ) अद्ययावत् शास्त्रपद्धतीनुसार हिंदुस्थानची भाषापाहणी नव्यानेंच हातीं घ्यावी. ( ६ ) भारतीय भाषा-विज्ञानासाठीं एक ग्रंथसूचक ( Bibliography Service ) संस्था सुरू करावी. ( ७ ) परिषदेसमोर आलेली डॉ. कत्रे यांची योजना अतिमहत्त्वाची असल्यामुळें, हिंदुस्थानांतील सर्व ठिकाणच्या विद्वानांच्या साह्यानें योजनेचें कार्य शक्य तों लवकर सुरु करावें व त्यासाठीं लागणारी संघटना व मार्गदर्शन आणि इतर संस्थांचें सहकार्य मिळविण्याचें काम डेक्कन कॉलेजचे डायरेक्टर यांनीं डॉ. सुनीतिकुमार चतर्जी, डॉ. बाबूराम सक्सेना, प्रा. श्रीकांतैय्या व सर राल्फ टर्नर या सल्लागार-समितीच्या साह्यानें करावें. स्वयंस्फूर्तीनें पूर्णतया मदत करणाऱ्या व सवडीनुसार हातभार लावणाऱ्या विद्वानांना कांहीं तरी मानधन देण्याची व्यवस्था व्हावी. ( ८ ) ध्वनितत्त्व (phoneme) व सम्बन्धतत्त्व (morpheme) यांची नीट चिकित्सा करून शास्त्रशुद्ध असें प्रत्येक देशभाषेचें वर्णनात्मक व्याकरण व द्विभाषाकोश अंगीकारलेल्या ठराविक पद्धतीनें करून व हिंदी आणि इतर देशभाषांचे सामान्य शब्दसंग्रह व प्रचलित किमान शब्दसमूह (Basic Vocabulary) रचण्याचें कार्य प्रत्येक








देशभाषेच्या केन्द्रस्थानीं सुरू करावें. हे शब्दसंग्रह करतांना, जसेच्या तसे घेतलेले जे संस्कृत शब्द असतील त्यांच्या अर्थच्छटांचा अभ्यास सूक्ष्मपणें व्हावा. ( ९ ) भाषाविज्ञानाचीं तत्त्वें व अद्ययावत् अभ्यासपद्धति यांचें सखोल (intensive) शिक्षण देण्यासाठीं दर वर्षी उन्हाळ्यांत एक-दोन महिन्यांच्या मुदतीचे वर्ग डेक्कन कॉलेजमध्यें घेतले जावेत आणि या वर्गांचा फायदा योजनेशीं संबद्ध असलेल्या कार्यकर्त्यांशिवाय, या विषयाची गोडी असलेल्या इतर अभ्यासकांनाहि घेतां यावा. या वर्गांत अभ्यास करूं इच्छिणाऱ्या लायक विद्यार्थ्यांकरितां खासगी संस्था, विद्यापीठें व सरकार यांजकडून शिष्यवृत्त्या मिळविण्याची खटपट व्हावी.

भारतीय भाषा-विज्ञानास व्यवस्थित स्वरूप येऊन पाश्चात्त्य अभ्यासपद्धतीच्या बरोबरीनें वाटचाल करतां येण्यासाठीं वर नमूद केलेल्या ठरावांबरहुकूम कार्य व्हावयास पाहिजे. परंतु त्याच्याहि आधीं प्रादेशिक भाषाभाषांचे परस्परांशीं होणारे व्यवहार सुरळितपणें चालू होण्याची तत्काळ गरज आहे.

---

## नाना फडणीस व सखारामबापू

राजकारणी लोकांचें प्रतिस्पर्ध्यांशीं वागणें कसें असतें याचा अनुभव, सध्यां अनेक देशांतून राजकीय नेत्यांच्या संघर्षामुळें ज्या राजकीय घडामोडी घडून येत आहेत त्यावरून, आधुनिक इतिहासाच्या अभ्यासकास येत असतो. पेशवाईतहि राजकीय प्रतिस्पर्ध्यांशीं वागणूक विशेष भिन्न नव्हती असें दाखविणारा नव्यानेंच प्रसिद्ध झालेल्या पत्रांतील एक उतारा प्रा. **त्र्यं. शं. शेजवलकर** यांनीं पाठविला आहे. तो पुढें दिला आहे. ( प्रस्तुत उताऱ्यांत नाना फडणिसांचा 'बालाजीपंत' या नांवानें उल्लेख केला आहे. )

"सखारामपंतांचा सांप्रदाय दुषमनास आपले अंकित करून थोडीसी जरब दाखवावी, सर्वस्वे त्याचा नाश न करावा. याकरितां बालाजीपंतास राखिले. त्यांचा मनसुबा कचा, याकरितां दुषमनास दुखवून पुन्हां संरक्षण केलें. सखारामपंताचें सहस्रगुणेंकरून हरिपंत व बालाजीपंत शहाणे. सर्पास दुखवून जिवंत सोडणें बुद्धिमंताचे काम नाहीं. याकरिता आजीच समाप्त जाहले हा निश्चय करून सखारामपंतास कैदेंत ठेविले. कांहीं दिवस सिंहगडावर पंतमजकूर कैदेंत होते. त्याउपरि कोंकणांत प्रतापगडावर एक वर्षपर्यंत ठेविलें. तेथील आबहवा सखारामपंतास मानली. व कारपरदाजांनीं कैद केलें, परंतु जिवंत सखारामपंत आहे, कदाचित्, कांहीं उपायेकरून सुटला तरी अनर्थ करील, याविषईं चिंता व हृद्रोग रात्रंदिवस होता. याकरितां, कोंकणांत रायगड म्हणून किला रघुनाथराव गजरे, बालाजीपंताचे शालक प्रथम संमंधी, त्यांचे स्वाधीन आहे. व त्या गडावर वासुदेवभट कर्वे व बाला दीक्षित कोण्ही शिष्ट ब्राह्मण यांस कैदैत ठेविलें होतें, त्यांनीं परलोकास प्रयाण केलें. व रायगडांत कैद केल्यास, सत्वरच स्वर्गास मनुष्य जातें. स्वर्गाचा मार्ग तें स्थळ जाणून, व सखारामपंतांनीं कैदेंत श्रम किती दिवस अनभवावे, याकरितां रायगडावर कैदेंत ठेविलें. पायांत बेडी अहोरात्र व कोठिडीस कुलफ व दरीचकार सेवेंत दोघें माणसें. येक शूद्र आंधळा व बहिरा, व येक ब्राह्मण मुका. सीतळोदकें करून स्नान व भक्षायास जखीऱ्याचे मोठे तांदूळ याप्रमाणें सरंजाम नेमून दिघला होता. दिवसेंदिवस क्षीण प्रकृती होती. श्रावण शुद्ध त्रयोदशी छ ११ शाबान गुरुवारी सखारामपंतांनीं परलोकास प्रस्थान करून, शरीरत्याग रायगडचे किल्यावर केला."

[ हा उतारा **पुणें अखबार, भाग १ ला** 'मध्यवर्ति अभिलेख कार्यालय, हैद्राबाद सरकार १९५३' यांमधून उद्धृत केलेला आहे. ]








# सारसंकलन

## सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेचीं गेलीं २५ वर्षें

पुणें येथील **सुलभ राष्ट्रीय** ग्रंथमाला या प्रकाशन-संस्थेला या वर्षी २५ वर्षें पूर्ण होत आहेत. येत्या १ ऑगस्ट १९५३ ला सु. रा. ग्रंथमाला **आचार्य शं. द. जावडेकर** यांचा ग्रंथराज **'आधुनिक भारत'** याची सुधारून वाढविलेली दुसरी आवृत्ति प्रसिद्ध करीत असून, या प्रकाशनाच्या निमित्तानें आपलें रौप्यमहोत्सवी वर्ष साजरें करीत आहे, हें अत्यंत अभिनंदनीय होय.

**श्री. शंकरराव देव** यांनीं आपल्या कॉलेज-जीवनांत भावी सार्वजनिक आयुष्याबद्दल ज्या कांहीं सुरम्य कल्पना मनांत बाळगिल्या होत्या त्यांपैकींच सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेसारखी प्रकाशनसंस्था आपण काढावी ही एक होती. ही त्यांची कल्पना साकार होण्याची वेळ १९२८ सालीं आली. धुळें येथील श्री. रामेश्वर शेटजी यांच्या मनांत म. गांधींचें ' सत्याचे प्रयोग ' हें आत्मचरित्र मराठींत छापून प्रसिद्ध करावें असा विचार आला. श्री. शंकरराव देव यांनीं आपली प्रकाशन-संस्थेची कल्पना सत्यसृष्टींत आणण्याची ही एक चांगली संधि आहे असें वाटून आपला विचार श्री. रामेश्वर शेटजींना सांगितला व या 'आत्मचरित्रा'च्या प्रकाशनासाठीं खर्च करण्यांत यावयाची रक्कम मालेला भांडवल म्हणून देण्यांत यावी अशी विनंति केली. श्री. रामेश्वर शेटजी यांनाहि ती कल्पना पसंत पडली. नंतर संकल्पित संस्थेचें नामकरण ' सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला ' असें करण्यांत येऊन मालेचें १ लें पुष्प म. गांधींचें ' सत्याचे प्रयोग ' हें आत्मचरित्र प्रकाशित करावयाचें ठरलें. ' जीवनाच्या आदर्शावर प्रकाश पाडणारा व त्या सत्यादर्शाच्या पथावर मार्गदर्शक होणारा ग्रंथसंग्रह दरिद्री नारायणाच्या प्रत्येक मंगल भवनांत ठेवणें अर्थानें शक्य व्हावें ' हा या मालेच्या संचालकांचा हेतु होता व तदनुसार १ त्या पुष्पाची योजना होती. त्याप्रमाणें श्री. अप्पासाहेब पटवर्धन यांनीं केलेला ' सत्याच्या प्रयोगा' चा मराठी अनुवाद १९२८ सालीं मालेचें १ लें पुष्प म्हणून प्रसिद्ध झाला. यापुढें लवकरच आत्मचरित्राचा द्वितीय खंड प्रसिद्ध होऊन पुस्तक-प्रकाशनाचें काम जोमानें चालू झालें. पुढें श्री. शंकरराव देव यांनीं १९४२ सालीं प्रकाशनमाला संस्थेचा ट्रस्ट करून तो नोंदवून घेतला.

आतांपर्यंत मालेनें साहित्य आणि संस्कृति, कला आणि नीति, इतिहास आणि राजकारण, धर्म आणि तत्त्वज्ञान इत्यादि अनेक विषयांवर लहान-मोठीं मिळून ६२ पुस्तकें प्रकाशित केलेलीं आहेत. ' सत्याचे प्रयोग ', ' कॉंग्रेसचा इतिहास ', 'पं. जवाहरलाल नेहरूंचें आत्मचरित्र', 'आधुनिक भारत ', ' मानवजातीची कथा ', ' जागतिक इतिहासाचें ओझरतें दर्शन ' हे मोठे ग्रंथ आणि ' भारतीय संस्कृति ', ' हिमालयाचा प्रवास ', ' जिवंत व्रतोत्सव ', ' जीवनदर्शन ' यांसारखीं कित्येक छोटीं पुस्तकें मालेचीं भूषणेंच होत. ग्रंथसंपादनाच्या बाबतींत आचार्य स. ज. भागवत आणि आचार्य शं. द. जावडेकर यांचें मार्गदर्शन मालेला आरंभापासून लाभलेलें आहे.

## श्री. अशोक मेहता यांचें

### भारतीय राजकारणाचें निदान

प्रजासमाजवादी पक्षाची एक ' कन्व्हेन्शन ' बैतूल येथें १४ जून १९५३ ते १८ जूनपर्यंत भरली होती. या बैठकीसमोर श्री. अशोक मेहता यांनीं देशापुढील राजकीय, सामाजिक व आर्थिक प्रश्नांचें तात्त्विक विवेचन करून, कांहीं मूलभूत सिद्धांत मांडले आहेत. हे सिद्धान्त राज्यशास्त्रांतील गतानुगतिक विचारपरंपरेला धक्का देणारे असून, श्री. अशोक मेहताआदि समाजवादी विचारवंतांच्या स्वयंप्रज्ञतेचे द्योतक आहेत. **' मागसलेल्या अर्थव्यवस्थेंतून अपरिहार्यपणें उत्पन्न होणारें राजकारण** ( Political Compulsions of a Backward Economy ) या दृष्टीनें श्री. अशोक मेहता यांनीं विचार केला असून, या त्यांच्या सिद्धान्तावर हल्लीं विचारवंतांमध्यें जोरानें चर्चा जारी आहे. म्हणून श्री. अशोक मेहता यांच्या त्या प्रतिपाद्या-( Thesis ) मधील कांहीं प्रमुख मुद्दे 'साधने'–( २०–६–५३ ) वरून संक्षेपानें पुढें उद्धृत केले आहेत :








# सारसंकलन

"राष्ट्रीय ऐक्य, लोकशाही व सामाजिक परिवर्तन हे तीन मूलभूत निकष आहेत. आपलीं सर्व धोरणें या मूलभूत ध्येयाशीं संवादी असलीं पाहिजेत. कम्युनिझम व कम्युनॅलिझम म्हणजे जातीयवाद हीं या ध्येयाशीं विसंगत आहेत म्हणून आमचा त्या दोन प्रवृत्तींना सतत विरोधच राहणार. या दोहोंपैकीं कोणतीहि प्रवृत्ति बहुसंख्य बनून सत्ताधारी व्हावी हें आम्हांला कधींच रुचणार नाहीं. सत्ताधारी कॉंग्रेस पक्षासमोर विरोधी म्हणून जे पक्ष आज उभे आहेत त्यांमध्यें राष्ट्रवाद, सांप्रदायिकधर्मरहित विचार व लोकशाही या तीनहि दृष्टींनीं प्रजासमाजवादी पक्षच कॉंग्रेसला जवळ वाटतो; म्हणूनच कॉंग्रेसच्या अध्यक्षांनीं आमच्याजवळ सहकार्याचा हात पुढें केला.

"कॉंग्रेस पक्षाशीं सहकार्य करण्याचा विचार सोडला तरी विरोधी पक्ष म्हणून आपलें धोरण निश्चित करणें आवश्यक आहे. 'विरोध हेंच विरोधी पक्षाचें कर्तव्य' या सूत्रावर आपला निर्वाह होणार नाहीं. भारतासारख्या औद्योगिक दृष्ट्या मागसलेल्या देशांतील विशिष्ट परिस्थितीचा वास्तववादी दृष्टीनें विचार करूनच विरोधाचें धोरण आणि मर्यादा आपल्याला ठरविल्या पाहिजेत. औद्योगिक दृष्ट्या मागें असल्यामुळेंच जातिविवाद, प्रांतिक दुरभिमान व परंपरागत निष्ठा यांचा आपल्या समाजावर फार मोठा पगडा आहे. जनतेमधील असंतोष क्वचितच डोळस व बुद्धिनिष्ठ रूप धारण करतांना दिसतो. तो बहुतेक वेळां परंपरागत व बुद्धीला मान्य न होणाऱ्या रूपानें व्यक्त होतो. समता, त्याग आणि कष्ट या तीन गोष्टी समाजानें अंतःकरणपूर्वक मान्य केल्याशिवाय सामाजिक प्रगति अशक्य आहे. थातुरमातुर करून किंवा सवंग लोकप्रियता मिळाल्यानें सामाजिक प्रश्न सुटणार नाहींत. कर वाढवावे लागतील किंवा जनतेला काटकसर शिकवावी लागेल. पण विरोधी पक्षांना हें बोलून दाखविण्याचें चारित्र्य होणार आहे का?

"नुसत्या लोकशाहीमध्येंहि अनेक उणीवा आहेत. त्या जर आपण समजावून घेतल्या नाहींत तर विरोधासाठीं विरोध करून कार्यभाग साधणार नाहीं. भारतासारख्या मागसलेल्या देशांत एका बाजूनें हुकुमशाहीकडे तोल झुकतो तर दुसऱ्या बाजूनें विघटना व विच्छेद यांच्याकडे तोल झुकतो. यासाठीं आम जनतेमध्यें पाळेंमुळें असलेलें विकेंद्रित असें संयुक्त सरकार येथें स्थापन होऊं शकलें तर आपला मार्ग कदाचित् सुकर होईल ( Strengthening the forces of pluralism in authority and initiative ). प्रत्येक खेडेगांवीं एक सहकारी संस्था व प्रत्येक धंद्यांत एक मजूरसंघटन सक्तीनें घडवून आणलें व या संघटनांमध्यें अंतर्गत लोकशाही नांदली तरच विकेंद्रित सत्तेचा भार व जबाबदारी सहन करणाऱ्या संस्था अस्तित्वांत येतील.

"राजकीय पक्षांना विशिष्ट तत्त्वप्रणाली—'आयुडिऑलॉजी' (ideology) असली पाहिजे असें आज मानलें जातें. पण 'आयुडिऑलॉजी'ची प्रथम व्याख्या केली पाहिजे. जीवनाच्या सर्व व्यापारांचें नियंत्रण करण्यासाठीं हिंदुधर्मातील आचारकांडाप्रमाणें कम्युनिस्टांनीं एक सर्वव्यापी तत्त्वप्रणाली—म्हणजे आयुडिऑलॉजी—तयार केली आहे. आपल्याला फक्त राजकीय व सामाजिक प्रश्नांपुरतीच मर्यादित असणारी तत्त्वप्रणाली हवी आहे. जीवनाच्या इतर क्षेत्रांत आपण भिन्नतेचे उपासक आहोंत. आज आपण असें पाहतों कीं, एकाच तत्त्वप्रणालीचा आधार घेऊन भिन्न पक्ष भिन्न आचार करतात. त्यामुळें 'आयुडिऑलॉजी'चा व्यवहारांत पोरखेळच होतो. मागसलेल्या देशांत विविध पक्षांचें धोरण कांहीं प्रश्नांबाबत एकच असतें. तेव्हां प्रत्येक ठिकाणीं पावलोंपावलीं 'आयुडिऑलॉजी'चा फरक दाखविणें अशक्य होऊन बसतें. या देशांत लोकशाही व समाजवाद हे दोन्हीहि प्रयोगावस्थेंत आहेत. तेव्हां आपण अनुभवानें वाट काढीत पुढें गेलें पाहिजे.

"राजकीय पक्षांच्या चर्चेंत सैद्धांतिक तत्त्वनिष्ठा व वास्तववादी व्यवहारबुद्धि यांची सांगड घालावी लागते. तर्कशुद्ध वादविवादानें कॉंग्रेस व कम्युनिस्ट या दोहोंशींहि असहकार करणें आवश्यक आहे असा सिद्धान्त प्रतिपादितां येईल; पण तेवढ्यानें निभणार नाहीं. दैनंदिन प्रश्न फार गुंतागुंतीचे असतात आणि व्यवहाराचाच त्या ठिकाणीं विचार

करावा लागतो. पक्षाचें स्वतंत्र धोरण असावें हें म्हणणें सोपें आहे, पण त्यासाठीं आवश्यक ती संघटना पक्षांत निर्माण करणें त्याहूनहि महत्त्वाचें आहे. शेवटीं पक्षाच्या आंतरिक शक्तीमुळेंच पक्षाचें ध्येय-धोरण प्रभावी होत असतें.

" मिशनरी बाण्यानें हजारों कार्यकर्ते पक्षाच्या मागें उभे केल्याशिवाय सैद्धान्तिक चर्चा फलद्रूप होणार नाहीं. "

## गांधीजींचीं सरदारांना पत्रें

महात्मा गांधींनीं आपल्या विविध कार्यप्रवृत्तींत अनेकांना अनेक तऱ्हेचीं पत्रें लिहिलीं आहेत. अशा त्यांच्या पत्रांचे व्यवस्थितपणें संकलित केलेले संग्रह प्रसिद्ध करण्याचें काम 'नवजीवन' या संस्थेनें सुरू केलें आहे. अशा प्रकारें गांधीजींनीं मीराबेनला लिहिलेलीं पत्रें आणि आश्रमांतील स्त्रियांना उद्देशून लिहिलेलीं पत्रें यापूर्वीं संग्रहरूपानें प्रसिद्ध झालीं होतीं. त्यानंतर आतां सरदार वल्लभभाईंना लिहिलेल्या पत्रांचा संग्रह प्रसिद्ध झाला असून, त्यांचें संकलन श्री. मणिबेन पटेल यांनीं अत्यंत नमुनेदार केलें आहे. या पत्रसंग्रहांतील शेवटशेवटचीं ४७ सालचीं पत्रें तर बापू व सरदार यांच्या मनःस्थितीचें अत्यंत हृदयंगम चित्र आपणांपुढें उभें करतात. त्याला श्री. नरहरिभाई परीख यांनीं छोटीशी प्रस्तावना जोडली आहे. तीमुळें गांधीजी व सरदार यांच्यामधील अत्यंत गाढ अशा संबंधावर उत्तम प्रकाश पडतो. त्या प्रस्तावनेचा कांहीं भाग पुढें संक्षेपानें उद्धृत केला आहे :

" सरदारांचा बापूजींबरोबर प्रथम संबंध आला तो राजकारणांत. गांधीजी हिंदुस्थानांत आले त्यापूर्वीं येथें अर्ज-विनंत्यांचें राजकारण चालू होतें. बापूजींनीं त्यांत प्रत्यक्ष लढ्याचें तत्त्व आणून सोडलें. सरदार त्यामुळेंच विशेषतः बापूंकडे आकर्षिले गेले...बापूजींचें राजकारण संकुचित किंवा एकांगी नव्हतें. सत्यशोधनाच्या त्यांच्या धार्मिक वृत्तीमुळेंच ते राजकारणाकडे ओढले गेले. त्यामुळें गांधीजींचें राजकारण जीवन-व्यापी होतें...त्या सर्व बाबतींत सरदारांहि पुरें लक्ष घालीत. तरी पण त्यांना विशेष गोडी राजकीय बाबतींतच होती. तेंच त्यांचें खास क्षेत्र होतें. गांधीजींच्या सरदारांबरोबरच्या संबंधाचें अशा प्रकारचें वर्णन महादेवभाईंच्या डायरीच्या पहिल्या पुस्तकांत आपणांस आढळतें ( पृ. ६–७ ). त्यांत बापूजी म्हणतात : ' माझा व वल्लभभाईचा संबंध धार्मिक ( spiritual ) म्हणतां येणार नाहीं... ' मात्र त्यांचा संबंध कुटुंबांतील अंतरंगांतल्या माणसा-सारखा होता हें खचित. येरवडा जेलमध्यें ता. ८–५–३३ रोजीं बापूजींनीं आत्मशुद्धीसाठीं व समाजशुद्धीसाठीं २१ दिवसांचा उपवास सुरू केला व त्याच दिवशीं त्यांना सोडून देण्यांत आलें, तेव्हां जें वक्तव्य त्यांनीं केलें त्यांत सरदारांबरोबरच्या त्यांच्या संबंधाचें हुबेहूब वर्णन आलें आहे : 'जेलमध्यें सरदार वल्लभभाईंबरोबर मला राहावयास मिळालें हा एक मोठा लाभच होता. त्यांचा अद्वितीय शूरपणा व ज्वलंत देशप्रेम यांची माहिती मला होतीच; पण या सोळा महिन्यांत ज्या प्रकारें मी त्यांच्याबरोबर राहिलों तसें राहण्याचें सद्भाग्य यापूर्वीं मला लाभलें नव्हतें. त्यांनीं ज्या प्रेमानें मला न्हाऊन टाकलें त्यामुळें मला माझ्या प्रिय आईचें स्मरण येत होतें. त्यांच्यामध्यें असे मातेचे गुण असतील याची मला कल्पनाच नव्हती. मला जरा कांहीं झालें कीं, ते अंथरुणावरून उठलेच. माझ्या व्यवस्थेमधील अगदीं लहानसहान गोष्टीं-बद्दलहि ते स्वतः काळजी घेत... ' या प्रेमामुळेंच या पत्रसंग्रहांत आपणाला आढळून येतें कीं, जे वल्लभभाई बापूजींचे ' भाईश्री ' होते ते पुढें बापूजींचे ' भाई ' झाले व शेवटीं तर नुसते ' चि. ' ( चिरंजीव ) बनले ! या संग्रहांतील बहुतेक पत्रें राजकीय बाबींसंबंधीं असूनहि त्यांत बापूजींचें सरदारांबद्दलचें तसलेंच प्रेम व अगत्य आढळून येतें......

" सरदार बापूजींच्या ' हो ' ला ' हो ' म्हणणारे व अंधानुयायी होते असें म्हटलें जाई. अनुयायी ते होते हें खरें. पण ते किती प्रमाणांत ' अंध ' होते हा प्रश्न आहे. राजाजींनीं एका प्रसंगीं म्हटलें आहे कीं, बापूजींचे इतर अनेक अंधानुयायी असतील, पण सरदार मात्र अंध नव्हतेच नव्हते. ते नेहमीं बापूजींच्या नजरेनें पाहण्याचा प्रयत्न करीत; पण त्यांना स्वतःची दृष्टि नव्हती असें नाहीं. ...








सन १९४० मध्यें चालू असलेल्या दुसऱ्या महायुद्धांत दोस्तराष्ट्रांना मदत करावी कीं नाहीं असा प्रश्न कॉंग्रेसपुढें उभा राहिला. कॉंग्रेसचें धोरण सत्य व अहिंसेचें असल्यामुळें अशी मदत कशी करतां येईल असा तो प्रश्न होता...त्या वेळीं कॉंग्रेसच्या कार्यकारिणीनें व महासमितीनें सशर्त मदत करण्याचा ठराव केला. तेव्हां गांधीजींनीं आपणांस कॉंग्रेसच्या सल्लागाराच्या कामांतून मोकळें करावें अशी विनंति केली व ती कॉंग्रेसनें स्वीकारली. सरदारांवर हा एक धर्मसंकटाचा प्रसंग होता. गुजरात प्रांतिक समितीपुढें ता. १९–७–४० रोजीं ही परिस्थिति स्पष्ट करणारें भाषण सरदारांनीं केलें. त्यांत ते म्हणाले कीं, 'बाहेरचे लोक मला आजपर्यंत बापूंचा अंधानुयायी म्हणत. मी म्हणत असे कीं मी तसा असतों, तर मला फारच अभिमान वाटला असता; पण मी तसा नाहीं हें मला दिसत आहे. आजहि मी बापूंना म्हणतों आहे कीं तुम्ही नेतृत्व स्वीकारीत असाल तर आम्ही तुमच्या मागें येतों. पण ते म्हणत आहेत कीं डोळे उघडे ठेवून आपल्या बुद्धीप्रमाणें चाला.... जर तुम्हांला असें वाटत असेल कीं, बापू म्हणतात तें बरोबर आहे, तर तसा ठराव करा व त्याची अंमलबजावणी करा, मग मात्र त्यांना दगा देतां कामा नये....बापूजी आपणाकडून आंधळा विश्वासूपणा अपेक्षीत नाहींत. आपली शक्ति किती आहे तें आपण त्यांना स्पष्टपणें सांगितलें पाहिजे...' याच बाबतींत गांधीजींनीं 'हरिजनबंधू'च्या ता. १४–७–४० च्या अंकांत पुढीलप्रमाणें लिहिलें आहे: 'आतां सरदार व मी निरनिराळ्या मार्गांनीं जात आहोंत असें वाटलें, तर खुशाल वाटो; पण त्यामुळें आमचीं हृदयें थोडींच वेगळीं झालीं आहेत? माझ्यापासून दूर जात असतांना मला त्यांना अडवितां आलें असतें. पण तसें करणें मला योग्य वाटलें नाहीं...जनतेबद्दल माझें जें मत आहे तें बरोबर असेल, तर राजाजी व सरदार पहिल्याप्रमाणेंच माझ्या बाजूनेंच हात उंच करतील....' १९४७ सालीं देशाची फाळणी आणि पाकिस्तानची निर्मिति या गोष्टी कॉंग्रेसनें स्वीकारल्या तेव्हांहि सरदार बापूजींहून निराळ्या दिशेनें चालले होते. बापूजींनीं स्वतःच ता. १३–४–४७ च्या पत्रांत सरदारांना म्हटलें आहे कीं, 'मला हेंहि दिसत आहे कीं, आपणामध्यें विचारांच्या दिशेबाबतहि भेद उत्पन्न झाला आहे.' तरी पण सरदारांना बापूजींचा विश्वास अखेरपर्यंत लाभला... बापूजी गेल्यावर जवळजवळ तीन वर्षें ते जगले. पण जगण्यांत त्यांना मजा वाटत नव्हती. देशापुढें अनेक बिकट प्रश्न होते. ते सोडवीत, ईश्वर जगवील तोंवर जगावयाचें व शक्य ते प्रयत्न करावयाचे अशी त्यांची कर्तव्यबुद्धि व धर्मबुद्धि होती...."

## भारतांतील संग्रहालयाच्या विकासाची दिशा

सुप्रसिद्ध वस्तुसंग्रहशास्त्रज्ञ डॉ. एच्. गोएट्झ यांनीं 'इलस्ट्रेटेड् विकली'च्या १७ मेच्या अंकांत बडोद्याच्या प्रगतिपर चित्र-वस्तुसंग्रहालयाबद्दल लेख लिहितांना नव्या हिंदुस्थानांतील वस्तुसंग्रहालयाच्या प्रगतीची एक दिशा निवेदन केली आहे. त्यांतील कांहीं भाग पुढें सारांशानें उद्धृत केला आहे:

"पूर्वीं संग्रहस्थानांचें महत्त्व फक्त जुने जीर्ण अवशेष आणि जुन्या ग्रथांचे चालू काळांतील मावळते अवशेष संग्रहीत करणें एवढाच होता; म्हणजेच त्यांचें स्वरूप पुराणवस्तुसंग्रहांचें, मानवशास्त्राच्या अवशेषसंग्रहांचें आणि जुन्या कलाकुसरीच्या नमुन्यांच्या संग्रहांचें होतें. आज आपणांला नागरिकांच्या सर्वांगीण प्रगतीच्या दृष्टीनें त्याकडे पाहावयाचें आहे. आपले वस्तुसंग्रह आतां अशा तऱ्हेनें योजिले पाहिजेत कीं, ज्यामुळें जीवनाचें दर्शन एका समग्र आणि विकासी उत्क्रांतीच्या स्वरूपांत आपणाला होईल; त्या उत्क्रांतींत निसर्ग माणसाला आकार देतो व माणूस निसर्गाला घडवितो; तेथें भूतकाळ म्हणजे भविष्यकालाची उभारणी करण्यासाठीं भरलेला पाया असतो, आणि इतर सर्व राष्ट्रें व देश त्या उत्क्रांतिकार्यांत राजकीय व सांस्कृतिक रीत्या आपणांशीं सहकार्य करीत असतात. व्यक्तिशः चित्रांचीं प्रदर्शनें कितीहि विविध प्रकारचीं असोत, संग्रहालयांचें कार्य कितीहि वेगवेगळें असो, तरीहि ह्या मूलभूत ध्येयानुसार आपल्या संग्रहालयांचें स्वरूप व घटना हीं घडविलीं गेलीं पाहिजेत.

"अशा तऱ्हेचा, समग्र दृष्टीनें संग्रहालय








बनविण्याचा मोठा प्रयत्न बडोद्यास कै. सयाजी महाराजांनीं केला आणि श्री. व्ही. टी. कृष्णमाचारी यांनीं जी संग्रहालयांच्या सुधारणांची योजना दहा वर्षांपूर्वी चालू केली होती त्यामुळें वेगवेगळ्या तऱ्हेचे वस्तु-चित्रसंग्रह एकत्रित व एकरूप करणें शक्य झालें. आतां ती योजना मुंबई सरकारनें निदान ऐतिहासिक आणि कलाविषयक संग्रहांबाबत तरी पुरी केली आहे.

"या योजनेप्रमाणें सृष्टिविज्ञान, मानवशास्त्र, पुराणवस्तुशास्त्र, कला वगैरे विषयांचे, हिंदी, आशियाई, युरोपिअन, अमेरिकन आणि पॅसिफिक वगैरे राष्ट्रांमधील प्रातिनिधिक वस्तुसंग्रह गोळा करून त्यांना असें एकत्रित करावयाचें आहे कीं, त्यांतून एक 'पाठ्यपुस्तक'च तयार व्हावें. तें (दृश्य) 'पाठ्यपुस्तक' व्यवस्थितपणें जुळवून व योग्य स्पष्टीकरण केलेल्या मौलिक अशा वस्तूंतून निर्माण करावयाचें आहे. म्हणून बडोदें म्यूझिअममध्यें कला-विषयक व ऐतिहासिक वस्तू अनेक भिन्न संस्कृति-सुधारणांच्या अनुरोधानें जुळविण्यांत आल्या व जेथें जेथें शक्य व इष्ट वाटलें तेथें तेथें त्या ऐतिहासिक क्रमानेंहि जुळविण्यांत आल्या. त्यामुळें भूगोल, मानवशास्त्र, मानवेतिहास व कलेतिहास यांचा अभ्यास शक्य होतो. अर्थात्, अशा वर्गीकरणांत प्रत्यक्ष वस्तूंचा मूळ आशय (spirit) आणि त्यांचें सौंदर्यतत्त्व यांना हानि न पोंचेल अशी काळजी घ्यावी लागते.

"हीं वस्तुप्रदर्शनें नैसर्गिक वाटलीं पाहिजेत. म्हणजे एखाद्या कालखंडांतील कला किंवा संस्कृति (Civilization) यांत काय वैशिष्ट्य होतें, तें प्रेक्षकांच्या लक्षांत येण्याइतकी तरी तीं वास्तवदर्शी असलीं पाहिजेत...अशा प्रकारच्या व्यवस्थे-मुळें मोठ्या तशाच लहान वस्तूंतील अंतर्गत सौंदर्य व्यक्त व्हावयास पूर्ण वाव मिळतो. अत्युत्कृष्ट चित्रांचें किंवा कलात्मक वस्तूंचें एकेकटें वेगवेगळें प्रदर्शन केल्यानें हें कार्य अधिक साधतें. पण त्यासाठीं फार मोठीं संग्रहस्थानें पाहिजेत. म्हणून अशा प्रकारें समूहवार जुळवणी करण्यानें विविधता उत्तम साधते. या योजनेमुळें त्या समूहांत कोठें कमतरता आहे हें तात्काळ प्रत्ययास येतें. तसेंच वस्तुसंग्रहालयांत ज्या कांहीं किंमती वस्तू असतील त्यांवर लक्ष वेधलें जाण्यास फार मदत होते. बडोदें म्यूझिअममध्यें अशा अनेक आकर्षक वस्तू आणि उत्कृष्ट कृती संग्रहिलेल्या असून त्या केवळ आपल्याच राष्ट्रांतील नसून आंतरराष्ट्रीय स्वरूपाच्याहि त्यांत कित्येक गोष्टी आहेत..."

**मुंबई राज्यांतील पदार्थसंग्रहालयें (Museums)**

संग्रहालयें हीं जनतेच्या शिक्षणाचीं खरीं साधनें झालीं पाहिजेत अशा आशयाचा मुंबईच्या 'प्रिन्स ऑफ वेल्स म्यूझिअमचे क्युरेटर श्री. रणछोडलाल ज्ञानी एम्. ए. यांनीं एक लेख 'अखंड आनंद' या गुजराती मासिकाच्या जून १९५३ च्या अंकांत लिहिला आहे. त्यावरून मुंबई राज्यांतील संग्रहा-लयांची माहिती श्री. विश्वास चौगुले (राजकोट) यांनीं संकलित करून पाठविलेली पुढें दिली आहे :

(१) 'व्हिक्टोरिया आणि आल्बर्ट म्यूझियम'—भायखळा भागांत असलेल्या राणीचा बाग नांवाच्या विख्यात बागेंत हें म्यूझिअम आहे. त्याची स्थापना इ. स. १८४८ मध्यें झाली. या संग्रहालयाची व्यवस्था मुंबई कार्पोरेशनतर्फे ठेविली जाते. सबंध वर्षांत अंदाजें वीस लाख लोक हा संग्रह पाहतात. त्यांत विद्यार्थ्यांची संख्या जवळ जवळ १०-१२ हजार आहे. गांवांची स्वच्छता, मिल आणि कारखान्यांत उत्पन्न होणाऱ्या कित्येक वस्तू, हुन्नर, उद्योग, मुंबईची ऐतिहासिक माहिती यासंबंधीं साधनें, हिंदुस्थानांतील विविध जनतेची वेषभूषा, मुखाकृत्या, देवदेवांच्या मूर्ती, जुनीं चित्रें, हस्तलिखित पुस्तकें इत्यादि गोष्टींचा या संग्रहालयांत समावेश आहे. संग्रहालयाच्या बाहेर वेगवेगळ्या पशुपक्ष्यांचे नमुने आहेत. वनस्पति-शास्त्राच्या अभ्यासासाठीं वृक्षांच्या नांवांच्या पाट्या वृक्षांच्या खोडावर ठेवलेल्या आहेत. (२) दुसरें संग्रहालय 'प्रिन्स ऑफ वेल्स' म्यूझिअम आहे. त्याची स्थापना १९०५ मध्यें झाली. परंतु १९२१ मध्यें तें खुलें करण्यांत आलें. या संग्रहालयांत दररोज सरासरी ३२०० माणसें येतात. या संग्रहा-लयाचें वैशिष्ट्य हें आहे कीं, प्राथमिक शिक्षण घेणाऱ्या लहान मुलांपासून तो विश्वविद्यालयाचें

उच्च शिक्षण घेणाऱ्यांपाशीतों आणि त्याचप्रमाणें खास विषयांचें संशोधन करणारे, त्यांत रस घेणारे— या सर्वांना उपयुक्त होईल अशा प्रकारची साधन-सामग्री आणि त्यासंबंधींचें प्रदर्शन येथें पाहावयास मिळतें. मुंबई राज्याचें हें मुख्य प्रांतिक संग्रहालय आहे. आणि त्यांत प्राणिविद्या, कलाकौशल्य आणि प्राचीन परंपरेला अनुसरून असणाऱ्या सर्व भारतामधील आणि विशेषतः पश्चिम हिंदमधील वस्तूंचा संग्रह आहे. ( ३ ) 'इन्डिअन हिस्टॉरिकल रिसर्च इन्स्टिटयूट'चें एक लहान संग्रहालय घोबी-तलावाजवळील सेंट झेविअर्स कॉलेजमध्यें आहे. त्यांत देखील भारतीय इतिहासाच्या अभ्यासाची साधन-सामग्री आहे. कॉलेजमध्यें अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांसाठींच प्रामुख्यानें हें संग्रहालय स्थापिलें आहे. ( ४ ) याशिवाय ग्रँट मेडिकल कॉलेजमध्यें, तसेंच ( ५ ) गोवर्धनदास सुंदरलाल मेडिकल कॉलेजमध्यें देखील वैद्यकीय अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांसाठीं शरीरशास्त्र, प्राणिशास्त्र, चिकित्सा-शास्त्र इत्यादींसंबंधीं वनौषधि आणि रासायनिक विविध औषधांचा संग्रह आहे. मेडिकल कॉलेजमधील विद्यार्थी त्याचा अभ्यास करतातच. सर्वसाधारण जनताहि त्याचा फायदा घेऊं शकते.

मुंबई शहरांतील ह्या पांच संग्रहालयांशिवाय कावसजी जहांगीर, श्री. अरदेशर दैलाल, श्री. जगमोहनदास कल्याणदास मोदी, श्री. शांतिकुमार मोरारजी, श्री. पिरोजशहा पावरी वगैरे लोकांचीं अनेक खासगी संग्रहालयें आहेत. त्यांत मूर्ति, चित्रें, शिक्के इत्यादि आहेत. खास परवानगीनेंच हीं संग्रहालयें पाहावयास मिळतात.

मुंबई राज्यांत बडोदें येथें श्री सयाजीराव गायकवाड यांनीं स्थापिलेलें एक सुंदर, विशाल व लोकप्रिय संग्रहालय आहे. अहमदाबाद येथें कॅलिको मिलच्या संचालकांमार्फत एक म्यूझिअम चालविण्यां-त येत असून तेथें कापडउद्योगाच्या इतिहासाची माहिती फार चांगल्या तऱ्हेनें दिलेली आढळून येते. या संग्रहालयाचा तेथील कार्पोरेशनशीं किंवा सरकारशीं कांहींहि संबंध नाहीं. पुण्यांत रे मार्केट-वर 'लार्ड रे महाराष्ट्रीय इन्डस्ट्रिअल म्युझियम' आहे. यांत्रिक उद्योग आणि कारखाने यांविषयीं माहिती व याशिवाय वेगवेगळ्या पदार्थांपासून बनणाऱ्या वस्तू यांचा संग्रह येथें आहे. वापरण्यांत निकामी झालेल्या वस्तूंतून किती तरी उपयोगी वस्तू बनवितां येतात हें या संग्रहालयांत पाहाव-यास मिळतें. खेडेगांवांतील उद्योगवृद्धीसाठीं हें संग्रहालय आदर्श आहे. याशिवाय औंध, मिरज, सांगली, धरमपूर, इडार या भागांतहि लहान लहान संग्रहालयें आहेत.

## वाळवीचा पराक्रम

वाळवी किंवा तिचेच जातभाई 'टर्माइट्' किडे यांच्या पराक्रमाचा अनुभव सर्वांनाच आलेला असतो. पण या प्राण्यांनीं अमेरिकेंत जे विक्रम गाजविले आहेत त्यांचें वर्णन वाचलें म्हणजे आपण थक्कच होतों. या प्राण्यांचा कामसूपणा व चिकाटी जशी अपूर्व आहे तशीच त्यांची विनाशक शक्तिहि अद्वितीय आहे. त्यांच्या-विषयीं पुढील माहिती 'रीडर्स डायजेस्ट' ( जून १९५२ ) मधील एका लेखावरून पुढें संग्रहीत केली आहे :

वाळवीचा एकदां प्रादुर्भाव झाला म्हणजे तिचा बीमोड करणें जवळ जवळ अशक्य होतें. अमेरिकेंतील कॅन्सस शहरांतील एका वखारींत वाळवी आढळली. पुढें तें शहर मोठ्या पुरांत सांपडलें. ही वाळवी सात दिवस पाण्याखालीं होती. जंतु-प्रतिबंधक खात्याला वाटलें कीं, निदान वाळवीचा नाश झाला, हें दुःखांत सुख. म्हणून ते जरा जमीन खणून पाहतात तों वाळवी जिवंत आढळली आणि ती पुनः काम सुरू करीत असलेली दिसली. गरम हवेच्या दक्षिण अमेरिकेंतील देशांत ते आढळतात त्याअर्थीं ते थंड हवेंत वाढणार नाहींत असें वाटत होतें. पण त्यांनीं तेथेंहि उबेची जागा पाहून घराच्या पायांत आपलें ठाण मांडलें व संयुक्त संस्थानांतील उत्तरेकडील प्रत्येक संस्थानांत व कॅनडांत हे प्राणी पसरले. इन्डियाना-पॉलिस संस्थानांत १९३८ सालीं १०० घरें तपासलीं तेव्हां फक्त ३ घरांत वाळवी आढळली. दहा वर्षांनीं तपास करतां १०० पैकीं ४० घरांत ती आढळली.

वीस वर्षांपूर्वीं या प्राण्यांनीं संयुक्त अमेरिकेंत

दरसाल ४ कोटी डॉलर्सचें नुकसान केवळ शेत-जमिनींत चालविलें होतें. आतां हे प्राणी शहरांत-हि पसरले आहेत आणि तज्ज्ञ अधिकाऱ्यांच्या मतें आजचें दरसाल नुकसान १० कोटी डॉलर्सचें असावें. नायगेरियांत युद्धपूर्व काळांत या प्राण्यांनीं १ लक्ष पौंडांचें नुकसान केलें. मात्र हे प्राणी अजून ब्रिटिश बेटांत ठाण मांडूं शकले नाहींत.

टर्माइट् प्राणी जमिनीखालीं गरम व दमट जागीं राहतात. लांकडांतील सेल्युलोझ् द्रव्यावर ते जगतात. हें द्रव्य मृत लाकडांत फारच असतें. हे प्राणी स्वतः हें द्रव्य पचवूं शकत नाहींत, पण त्यांच्या पचनेंद्रियांत एक प्रकारचे अतिसूक्ष्म जंतू असतात ते हें द्रव्य पचवितात व त्यावर हे टर्माइट् वाढतात. पनामा कालव्याच्या आसमंतांत हे प्राणी फारच आहेत. तेथें पारा कोलोरॅडो नामक बेटांत टर्माइट्सच्या ४२ जाती सांपडल्या आहेत! यांपैकीं कांहीं जातींचे प्राणी केबलच्या तारांवरील शिशाचें आवरणहि फोडून आंत कांहीं खाद्य लांकूड आहे का तें पाहतात! ह्या कोप्टोटर्मिस नायगर नामक वाळवीच्या जातीचे किडे सिमेंट कॉंक्रीटचा भेद करून पांच इंच आंत गेलेले आढळले. हा खटाटोप सेल्युलोझसारखें खाद्य शोधण्याकरितांच होता. या जातीच्या वाळवीच्या अंगांतून स्रवणाऱ्या दुधाळ प्रवाही पदार्थांतील रसायनानें कॉंक्रीटमधील रेतींतील शंख-शिंपांचे सूक्ष्म कण विरघळले जातात व या प्राण्यांना मार्ग मिळतो! आर्सेनिक किंवा सोमल या जालिम विषानें अनेक प्राणी नष्ट होतात, पण टर्माइटच्या कांहीं जाती उलट या विषावर अधिकच वाढतात! टर्माइट्चा नाश करणें म्हणजे त्यांचें खाद्य जें सेल्यूलोझ तें पचविणाऱ्या सूक्ष्म जंतुंवर विषप्रयोग करणें हा होय. पण प्रथम प्रथम ९९ टक्के जंतू नष्ट झाले तरी त्यांतूनहि जिवंत राहणारे कांहीं असतात व ते या विषप्रयोगाला पुढें दाद देत नाहींत.

सर्वसाधारणपणें असें मानलें जातें कीं, वाळवी व त्या जातीचे हे किडे मृत लांकडांना नाश करतात, जिवंत लाकूड ते खात नाहींत. डॉ. झेटके या पनामा कालव्याच्या आजूबाजूच्या क्षेत्रांतील तज्ज्ञ अधिकाऱ्यांनीं मात्र, 'हा समज बरोबर नाहीं' अशा अर्थीं सूचना दिल्या आहेत. तरीहि एका बागवानानें अॅव्होकॅडो फळांची लागवड करावयाचें ठरविलें व प्रतिबंधक द्रव्यें न वापरतां बाग लावली. पुढें फळें धरल्यावर डॉ. झेटकेना त्यांपैकीं एक झाड तोडून पाहण्याची परवानगी बागवानाजवळून मिळवून झाड तोडून तपासलें, तर त्या झाडाच्या खोडांतील आंतला भाग संबंधच्या संबंध टर्माइट्च्या रांगांनीं भरलेला आढळला! एका वर्षाच्या आंत बागेंतील जवळ जवळ सर्व झाडें मेलेलीं आढळलीं!

## इंग्लिश रेडियो दुर्बिण

'सायन्टिफिक अमेरिकन' वरून पुढील माहिती संकलित केली आहे : आधुनिक काळांत खगोलशास्त्राची प्रगति अभूतपूर्व झाली आहे. १०० ते २०० इंची काचांच्या दुर्बिणींतून वरच्या सबंध आकाशाचें निरीक्षण करतां येऊं लागलें आहे. कॅलिफोर्नियांत माउन्ट पालोमारवर सर्वांत मोठी राक्षसी दुर्बीण उभी करण्यांत आली. या दुर्बिणींतून आतां सर्व आकाश स्पष्टपणें आलेखितां येईल व यांत दिसणाऱ्या खगोलाव्यतिरिक्त कांहीं गोल आकाशांत असणें अशक्यप्राय आहे असें २० वर्षांपूर्वीं वाटत होतें. परंतु आतां रेडियोजन्य किरणग्रहणांमुळें आकाशांत या 'दृश्य' पदार्थांपेक्षांहि निराळे असे गोल आहेत असें आढळून आलें आहे. त्यांतून प्रकाशकिरण जवळजवळ निघत नाहींत, पण त्यांतून रेडियोकिरण मात्र विकिरण पावत असतात. असे रेडियो-तारे जवळजवळ २०० तरी आढळून आले आहेत. याकरितां एक रेडिओ दुर्बिण १९५० सालीं मॅन्चेस्टर युनिव्हर्सिटीनें जॉर्डेल बॅन्क येथें उभारली. या तऱ्हेच्या दुर्बिणींची रचना करावयास लक्षावधि पौंडांचा खर्च येतो. असें असूनहि इंग्लंडमध्यें याहून मोठ्या दुसऱ्या दुर्बिणीची उभारणी चालू आहे. इंग्लंडची आजची आर्थिक परिस्थिति समाधानकारक नाहीं व कच्चा मालहि तेथें दुर्मिळ झालेला आहे. अशा वेळीं लक्षावधि डॉलर्स खर्चून व २००० टन पोलाद वापरून ही नवीन अजस्र रेडिओ-दुर्बिण जॉर्डेल बॅन्क येथेंच उभारण्यांत येत आहे.













अनुक्रमणिका

Regd. No. B. 5177



अनुक्रमणिका